# चमत्कारिक गोष्टी.

## बिरबल बादशहा यांच्या

## भाग ५वा.

हें पुस्तक

नारो आपाजी गोडबोले

यानीं तयार केलेलें.

त्यांचे

रत्नप्रसारक छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति ३.

पुणें पेठसदाशिव. ता. ७ जुलै १८८८

किंमत १ रुपया.

---

# अनुक्रमणिका

# चमत्कारिक गोष्टी.

(बिरबल बादशाहा वगैरे यांच्या

## भाग ५ वा.

गोष्ट १ ली.

## बादशाहा आणि बिरबल यांची उत्पत्ति.

पूर्वी हिंदुस्थानांत बैजर ग्रामाचे ठायीं ऋषभ नामक एक ब्राह्मण सदाचार संपन्न महा विद्वान असा रहात होता, त्याचा एक परम जिवलग मित्र सुधर्मा नामें [illegible]चा नापिक तोही चतुर आणि भाविक होता, ते उभयतां एकविचारें चालत असतां त्यांस कित्येक काळ लोटला. उपरांत कोणे एके समयीं ऋषभ ब्राह्मणानें मनांत विचार आणिला कीं, आपल्यास राज्यपद प्राप्त होण्यास्तव तपश्चर्या करावी असा हेतू अंतःकरणांत आणून तो आपला मित्र सुधर्मा यास श्रुत केला. त्या काळीं तो नापीक ही त्यास सल्ला देऊन म्हणाला हे सन्मित्रा माझे धर्मानुसार मला ही तुझी सेवारूप तपश्चर्या सांगावी म्हणजे तेणें करून मी ही तुझे समागमें सौख्य पावेन. याप्रकारें

त्याची मनीषा जाणून ऋषभानें त्यासही समागमें घेऊन प्रयाग क्षेत्राचे समीप भागीरथी तटाकीं आश्रम करून तेथें उभयतां राहिले. त्याठिकाणीं ऋषभ ब्राह्मण तपश्चर्या उत्तम प्रकारें करीत असतां बारावर्षे पूर्ण झालीं तथापि देवतेची रुप्रसन्नता झाली नाहीं त्या योगानें तो खिन्न मानस होत्साता सर्वसंग परित्याग करून चतुर्थाश्रम घेता झाला आणि पुनः तपश्चर्या चालविली.

सुधर्मा नापिक ही ब्राह्मणाचे स्नेहास्तव आणि- आपल्यास ही उत्तम सुख प्राप्तीचे हेतूस्तव आपले ज्ञानी धर्मानुसार ऋषभ यतीचे अनुसंगानें तपस्या करिता झाला.

नंतर दोन तपें (चोवीस वर्षे) तपस्या झाली तथापि देवतेचा प्रसाद झाला नाहीं त्याकाळीं संन्यासी यास अत्यंत खेद होऊन आपला मित्र नापिक जो त्या प्रत बोलता झाला. कीं, हे मित्र वरिष्ठा, आपण चोवीस वर्षे तपस्या करून कांहींच उपयोग जाहला नाहीं यास्तव आतां जनांत मुख दाखविणें हें फार अयोग्य- आणि लज्जाप्रद होय यास्तव या भागीरथींत देह

ठेवून परलोकास जावें असें अंतःकरणास वाटतें परंतु आत्म्यास क्लेश न द्यावे असें वचन आहे.

गते शोको न कर्तव्यं, भविष्यं नैव चिंतयेत्॥ न क्लेशयित्वा चात्मानं यत्स्वल्पमपि नद्रुह ॥१॥

**अर्थ**— गतगोष्टीचा शोक न करावा, पुढील भविष्य न चिंतावें तसाच आपले आत्म्यास वृथा क्लेश न द्यावा.

असें वचन आहे आणि प्राणाचा नाश केला असतां आत्म हत्येचें पातक लागतें तेव्हां यास काय उपाय करावा अशा मोठ्या विचारांत पडलों आहें.

सुधर्मा म्हणाला महाराज माझेही चित्तास अशीच उद्विग्नता जाहली आहे यास्तव शास्त्रास विरुद्ध न होतां सुखावह होईल तें करावें त्यास दोष नाहीं म्हटलें आहे.

कर्तव्यं सुविचारेण शास्त्रायच सुखायच॥

यास्तव दोष न घडतां आपले मनोगतानुरूप होण्यास एक युक्ति आहे तेव्हां संन्याशी म्हणाला

सद्युक्त असेल तर सांगावी.

सुधर्मा म्हणाला स्वामी, या प्रसंगीं त्रिवेणी-चा संगम जेथें आहे त्यास कर्वत असें म्हणतात त्या कर्वताचे ठायीं देह विसर्जन केला असतां आत्महत्ये-चें पातक न लागतां जी इच्छा अंतःकरणांत धरून प्राण सोडावा त्या हेतू प्रमाणें जन्मांतरीं प्राप्त होतें असें मी पुराणांतरीं विद्वज्जन प्रतिपादित शास्त्र वचन श्रवण केलें आहे तस्मात् आपण उभयतां हीं त्याप्रकारें-च त्या कर्वतीं देह पात करावा. याप्रकारें मित्राचें वचन ऐकून संन्याशी यास मान्य होतें झालें. उप्रांत उभयतांनींही तत्काळ सिद्धता केली. संन्याशी याचीं काषाय वस्त्रें तशींच पात्रें आणि सुधर्मा नापिकाचीं वस्त्रें पात्रें इत्यादि निरनिराळीं बांधून त्याची एकत्र मोट करून ती मोट एका वृक्षा समीप भूमींत चांगले बंदोबस्तानें पुरून ठेविली. नंतर उभयतांही त्या कर्वत स्थानीं येते झाले आणि प्रथमतः संन्याशी यानें संकल्प केला कीं, मजला सार्वभौमत्व पदाची प्राप्ती व्हावी. आणि पूर्वजन्मींची स्मृती असावी याप्रकारें अंतः-

करणांत इच्छा धारण करून करवतीं देह विसर्जिता झा-
ला. उपरांत सुधर्मान्हावी यानें संकल्प केला कीं, मजला
उत्तम कुळीं जन्म होऊन माझे मित्रानें प्रधानत्व मिळावें
आणि पूर्वजन्मींचें स्मरण रहावें अशी इच्छा धारण करू-
न करवतीं देह विसर्जिता झाला. उपरांत कांहीं काळें करू-
न ते उभयतां हस्तनापुराचे ठायीं जन्मास आले.

हस्तनापूर जें नगर त्यास सांप्रत दिल्ली शहर असें
लोक म्हणतात. तेथें शहाद अल्ली नामें बादशाहा राज्य
करीत होता त्यानें पुत्र प्राप्तीस्तव तपस्या केली होती त्या
योगानें सुप्रभ नामक संन्याशी त्या बादशाहाचे पोटीं ज-
न्मास आला. सुप्रभ यास उत्तम कुळींजन्म तपस्ये-
च्या प्रभावानें व्हावा परंतु तपस्या करते समयीं त्यानें -
अन्न वर्ज करून दुग्धच प्राशन केलें. तें वस्त्रपूत म्हण-
जे वस्त्रानें गाळीत नसल्यामुळें गाईचे केश त्याचे पोटां-
त गेले त्या दोषानें यवन कुळाच्या ठायीं त्यास जन्म हो-
ता झाला. त्याचें नांव अकब्बर असें शहाद अल्ली बाद-
शहा यानें ठेवून पुत्रोत्साह करिता झाला. नंतर कांहीं -
थोडके दिवसांत शहाद अल्ली मरण पावला तेव्हां अक-

ब्बरानें वय बारा वर्षांचें होतें त्याकाळीं संपूर्ण वजीर; उमराव यानीं त्यास बापाचे गादीवर बसविलें अकब्बर अल्पवई असतांही सर्व विद्या, कलाकुशलता, धैर्य, शौर्य मंडित असा होऊन बापाचे रीतीपेक्षां स्नीतीनें राज्य चालवूं लागला.

त्याच शहरांत वैजनाथ नामें ब्राह्मण रहात होता, त्याचे पोटीं तो स्वधर्मान्हावी जन्मास आला त्याचें नांव स्वयनाथ असें पित्यानें ठेविलें, तो पुत्र रूपवान आणि बुद्धिमान्, चतुर आणि धूर्त असता झाला. अल्पवयांत वेद शास्त्र आणि सकल विद्या कला, कुशलता यांत प्रवीण होता झाला. त्याचें दुसरें नाव बिरबल असें बादशहानें पुढें स्थापित केलें.

एके दिवशीं तो सुमनाथ शाळेंतून घरीं जात असतां राजवाड्या पुढें बहुरूपी याचा तमाशा होत होता तेथें अकब्बर बादशहा आणि त्याचे वजीर उमराव; आदिकरून सहस्त्रावधी लोक तमाशा पाहात असले होते. तेथें तोही मौज पहात उभा राहिला असतां बहुरूपी यानें बैलाचें सोंग आणिलें होतें तें असें कीं, प्रत्यक्ष

बैलन कीं काय? किमपीही न्यूनता नाहीं. तें सोंग पाहून संपूर्ण लोक चकित होऊन बहुरूपी यास शाबास शाबास म्हणून वाहवा करिते झाले. अकब्बर फार खुष होऊन बहुरूपीयास आपले आंगावरील भरजरी शेला आणि शाल बक्षीस देता झाला. तें पाहून रूपनाथ बाळ मनांत म्हणाला कीं, बादशाहानें या सोंगाची परीक्षा नकरितां उगाच बक्षीस दिलें. आपण तरीं परीक्षा पहावी असें मनांत आणून गुंजे एवढा खडा त्या बैलाचे पाठीवर टाकिला तो खडा लागतांच बहुरूपी यानें त्या ठिकाणी अंग थरारून भवरा केला, त्या समयीं त्या बाळाची खात्री होऊन म्हणाला कीं, हा बहुरूपी फारच गुणवान् आहे यास आपण सर्वस्व बक्षीस दिलें पाहिजे, असें म्हणून डोकीस जुनी टोपी, त्यार आण्याचे किमतीची होती ती बहुरूपी याचे आंगावर फेंकून दिली आणि वाहावारे शाबास शाबास म्हणून बोलता झाला. त्याकाळीं बहुरूपी अत्यंत खुष होऊन तें सोंग टाकून टोपी हातांत घेऊन बादशाहापुढें तिची प्रशंसा करिता झाला. कीं, महाराज, आपण बक्षीस दिलें त्याचें उ-

क्षगुणित ही टोपी आहे. माझे गुणाची परीक्षा या दहा हजार मनुष्यांत या टोपीचा मालक हा ब्राह्मणाचा मुलगा एकच करणारा आढळला. त्याजपाशीं एवढी-च जिनगी होती ती सर्वस्व बक्षिस दिली असें त्यानें सर्वस्व दान गुण पाहून केलें तें तुमचे बक्षिशीचे लक्ष-पट अधिक आहे या प्रकारें बादशाहानें ऐकून त्या वैज-नाथाचे पुत्रास समीप आणून परिक्षेचा प्रकार विचा-रिला तेव्हां त्यानें सांगितल्यावरून बादशहा सहवर्तमा-न सर्व लोकांस वाटलें कीं, हा मुलगा फार गुणवान् आणि मर्मज्ञ चतुर आहे तेव्हां त्याचा ठावठिकाणा विचा-रून बादशहानें त्यास हमेशा कचेरीस येण्याची आज्ञा करून त्याजला उत्तम प्रकारचीं वस्त्रें अलंकार देऊन गौरविलें. एके दिवशीं बादशाहानें बहुरूपी यास व्याघ्राचें सोंग आणण्या विषयीं सांगितलें तेव्हां तो बहुरूपी हात जोडून प्रार्थिता झाला कीं, महाराज, व्याघ्राचें सोंगाची संपादणी यथायुक्त होईल तर सों-ग आणण्याची शोभा, नाहीं तर तें व्यर्थ होय यास्तव कचेरींतील एका मनुष्याचा रुकून माफ असण्याची-

परवानगी होईल तर सोंग आणीन असें त्यानें भाषण ऐकून अकब्बर एका खुनाची माफी देता झाला. त्यानंतर सायंकाळीं कचेरी भरल्यावर बहुरूपी यानें खेळ चालू केला त्यांत अनेक प्रकारचीं सोंगें घेऊन शेवटीं व्याघ्रानें सोंग आणिलें तें हुबेहूब प्रत्यक्ष व्याघ्रच आला काय? असें मोठे धैर्यवान् शूर होते त्यांसही भासलें. सर्व कचेरींत हलकल्लोळ होऊन गेला. व्याघ्र वेषधारी विचार करितो कीं, एखादे गरीबास मारिलें असतां त्याचा कुटुंबघात होईल याजकरितां अकब्बराचे मातोश्रीचा बंधु जो शेख हुसेन त्यास मारिलें असतां त्याचे कुटुंब पोषणास अडचण नाहीं असें मनांत योजून तत्काळ त्याजवर झेंप टाकून जिवें मारिला. तेव्हां मोठा हाहाःकार जाहाला. अकब्बराचे मातुश्रीनें बंधुस्तव अतिशय शोक करून दुराग्रह धरिला कीं, माझा बंधू मारिला त्या बहुरूपी याचे प्राणाचा नाश केला पाहिजे. सर्व कचेरी बरखास्त जाहली. बादशाहाची माता रुसोन बसली अन्नोदक ही सेवन करीना त्यासमयीं अकब्बरासह प्रधानादिक यांस मोठा विचार पडला कीं,-

आतां काय करावें नंतर त्या विषयीं विचार करण्यास पुनः कचेरी करून मसलत करीत बसले परंतु कांहींच तडजोड निघेना ! बादशाहाचे वचनास बाध न येतां त्याचे मातेच्या मनोगतानुरूप होण्यास कोणासही युक्ती सुचेनाशी जाहली. त्या समयीं वैजनाथाचा पुत्र रूपनाथ त्या कचेरींत एका कोपऱ्यास बसला होता त्यानें सर्व हकीगत ऐकून अकब्बर यास अर्ज करिता जहाला कीं, खावंद मजला हुकूम करतील तर खावंदांचे वचनास अडचण न येता मातुश्रीचे मना सारखें होण्यास तजवीज मला सुचली आहे ती निवेदन करीन. तेव्हां अकब्बर म्हणाला कीं, अशा दोन्ही अडचणी निवारून कार्य होईल तर तुझे फारच उपकार होतील. तेव्हां रूपनाथ म्हणाला महाराज, ज्या बहुरूपी यानें व्याघ्राचें सोंग घेतलें होतें त्यासच सतीचें सोंग घेण्यास सांगावें म्हणजे अनायासें खावंदांचे वचनास बाध न येतां तो प्राणास मुकेल तेणें करून मातेचाही संतोष होईल. या प्रकारें वैजनाथ पुत्रानें भाषण ऐकून बादशहा सह सर्व लोकांस त्याचे बुद्धीनें आश्चर्य वाटून

शाबास शाबास म्हणते झाले नंतर त्याप्रमाणेंच त्या-
बहुरूपी यास सतीचें सोंग आणण्या विषयीं बादशाहा-
नें आज्ञा केली. नंतर त्यानें ही नें दुःख मनांत समजून
आज्ञा प्रमाण म्हाणोन दुसरे दिवशीं सतीचें सोंग आणि
लें कचेरी घनदाट भरली असतां तेथें अग्निकुंड प्रदी-
प्त करून सतीचे धर्मानुसार यथायुक्त दान धर्म करून
कुंडास प्रदक्षिणा करून उडी टाकणार तों बादशहाचे
मानेनें सत्वर धांवून हात धरिला आणि बोलती जाह-
ली कीं, शाबास आतां सोंग महकूब कर. तूं सोंग आ-
णणार वस्ताद धन्य होस माझी समज झाली अग्नीप्र-
वेश करूं नको. त्या काली बहुरूपी म्हणाला महाराज,
व्याघ्राचे सोंगाचे संपादणीस तुमचा बंधु मारण्यास मा-
गें सरलों नाहीं तो सांप्रत आपले प्राणाचे आशेस्तव मा-
गें सरणें हें मजपासून घडणें नाहीं, आपण आग्रह न-
करावा. असें बोलून अग्निकुंडांत उडी घातली आणि
प्राण सोडिला. या प्रमाणें खेळ समाप्त झाला. संपूर्ण
लोक घरोघर जाते झाले.

वैजनाथ ब्राह्मणाचा पुत्र सुप्रनाथ जो त्याजवर -

अकब्बर बादशाहाची मर्जी सुप्रसन्न होऊन म्हणाला कीं, उस् बम्मनको बीरका बल बडा हैं उस्‌वास्ते इस्को बिरबल नाम पुकारना. असें बोलून त्यास प्रधानकीचीं वस्त्रें द्यावीं अशा इरायानें आपले निकट कचेरीस हमेशा असण्याची आज्ञा करून त्यास वेतन आणि इनमाम खर्च नेमून दिला. नंतर दिवसें दिवस बिरबलाचे अकलेची प्रशंसा वृद्धिंगत होती झाली त्या विषयीं ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या पुढें लिहितों.

## गोष्ट २ री.

## रूस देशचे बादशाहाची हिकमत.

एके समयीं रूस देशींचा बादशाहा आदन नामक मोठा प्रतापी आणि अक्कलवंत असा होता. त्यानें दिल्लीचा बादशहा शहाद अल्ली मरण पावला त्याचा पुत्र अकब्बर नामें अल्पवयी गादीवर बसोन राज्य करीत आहे असें वर्तमान ऐकिल्यावरून त्यास अशी इर्षा उद्भवली कीं, शहाद अल्ली पराक्रमी आणि अक्कलवान होता त्या योगानें त्याचें राज्य हस्तगत होण्यास अवघड होतें सांप्रत तो मरण पावला यास्तव आतां

त्यानें राज्य हस्तगत होण्यास फार अयास नको असें मनांत आणून प्रधान आणि वजीर मिळवून त्यांस आपले मनांतील आशय कळविता जाहला. तेव्हां त्याचा मुख्य प्रधान शेख सय्यद यानें विचार काढिला कीं, अकब्बराची रिती स्थिती कशी आहे आणि त्याजपाशीं कोणी अकूलवान् आहे किंवा नाहीं याची परीक्षा पूर्वी केली पाहिजे असा विचार काढिला तो सर्वांस मान्य झाला. नंतर आदम बादशाहानें आपले प्रीतींतील अत्यंत रूपवान् तशीच नृत्य गायनादि कला कुशलता निपुण अशी जी केशला कळवंतीण तिजला बलावून आणून सांगितलें कीं, त्वां दिल्लीचे बादशाहाकडे जाऊन त्याची मर्जी सुप्रसन्न करून आपल्या गुणरूप योगानें त्याचें मन मोहित करून त्याची भाष घेऊन इतकेंच बक्षीस मागावें कीं, "तेरे गद्दीपर फरागत करनेको हुकूम देव" असें बक्षीस मागून घ्यावें नंतर त्यानें वचना प्रमाणें केलें तरबरें. अथवा वचन असत्य केल्हें तर चिंता नाहीं पण त्यास प्रसन्न करून भाष पूर्वक एवढें मागावें. हें कार्य त्वां करून आल्यावर दहा सहस्त्र रुपये

तुजला बक्षीस मिळतील आणि दहा सहस्र रुपये वाट खर्चीस परत येई पर्यंत पूर्वी मिळतील. असा हुकूम करून दहा हजार रुपये खर्चास देऊन मोठ्या इतमामानें तेथून तिची रवानगी करून दिली.

केशला कळवंतीण दिल्ली शहरांत येऊन एक परम रमणीय असें मंदीर प्रत्यहीं शंभर रुपये भाडे कबूल करून तेथें राहिली उप्रांत तेथील शहरांतील धनवान लोक तसेंच वजीर उमराव इत्यादिकांस आपले गुण, रूप पाशें करून कस्तुरी मृगवत मोहित करून असंख्य धन मिळविती झाली. तिची कीर्ती अकब्बर बादशहाचे कानीं सहजा सहजीं आली तेव्हां तिचे गुणाची प्रीती बादशाहाचे अंतरीं पीडा करिती झाली. तों एके दिवशीं ती केशला कचेरीस येऊन बादशहास वंदन करून अर्ज करिती जाहली कीं, खावंदांचे पायांपाशीं दोन घटका चाकरी करण्याचा हुकूम जाहला पाहिजे याप्रमाणें तिचें भाषण ऐकून बादशहा हुकूम करिता झाला कीं, आज रात्रौ नृत्यास यावें. नंतर ती बिऱ्हाडीं येऊन रात्रीच्या ठायीं सकल संगीत सरंजाम समागमे

घेऊन बादशहाचे मंदिरास येती जाहली. नृत्य गायन हावभाव कटाक्षेंकरून सकल सभाजनाचें चित्त हरण केलें. शेवटीं तिचे आंगीं जो अतिशय उत्तम गुण अवशिष्ट होता त्या गुणें करून बादशहाची मर्जी अत्यंत खुष करिती झाली. तेणेंकरून तो अती तल्लीन होत्साता अत्यंत मोहित होऊन तिजप्रत बोलता झाला कीं, शाबास वाहावा मोठी मजा केलीस यासमयीं तुजला वांछित असेल तें माग. केशला म्हणाली खुदावंत माझें मागणें विशेष नाहीं स्वल्प आहे पण खावंदांनीं सत्यवचनें करून भाक दिली तर मागेन. तें मला वचन द्यावें अकब्बरानें हातावर हात देऊन सत्यवचनानें सांगितलें कीं, तूं जें मागशील तें मजला कबूल असोन देण्यास मागें सरणार नाहीं. याप्रकारें ऐकून केशला म्हणाली गुन्हा माफ असोन एव ढेंच द्यावें. 'खावंदके गद्दीपर फरागत करनेका हुकूम होना चय्ये' याप्रकारें तिनें विपरीत मागणें ऐकून, बादशहास क्रोध आला. पण वचन दिलें असल्यामुळें त्याचा नाइलाज होऊन मोठे विचारांत पडला. कांहींतो-

डु कचेना तेव्हां तिजला सांगितलें कीं, तुझे मागण्या-
प्रमाणें हुकूम करणें तो उदईक देईन असें बोलून कचे-
री बरखास्त केली. आणि वजीर उमराव शास्त्री पंडीत
काजी इत्यादिक मिळवून विचार करीत बसले कीं, या-
कळवंतिणीस जबाब काय द्यावा. कोणी म्हणतात भल
तेंच मागणें मागते यास्तव तिजला कांहीं न देता हांकू-
न दिली तथापि सत्यवचनास बाध नाहीं कोणी म्हणतो
वचन सत्य केलें पाहिजे. कोणी म्हणतो गादीची अप्रति-
ष्ठा आणि जनांत निंद्य कर्म होतें असे अनेक तर्क करून
बोलते झाले परंतु कोणता ही निश्चय कोणाच्यानें सांग-
वेना असें मोठें संकट प्राप्त झालें त्यासमयीं बिरबल
तेथें नसोन ग्रामांतरास गेला होता दुसरे दिवशीं जबा-
ब द्यावयाचा तोही दिवस निघोन गेला. वचनास बाध
न येतां तिजला कुंठित करण्याची अक्कल कोणास ही न
व्हती. तिसरे दिवशीं बिरबल ग्रामांतराहून घरीं आ-
ला, त्यानें सर्व वृत्तांत श्रवण केला. उप्रांत बादशाहास
येऊन भेटला त्या समयीं अकब्बरानें सर्व हकीगत त्या-
स सांगितली ती ऐकून बिरबल म्हणाला खावंदानीं

वचन दिलें तें अनृत न होतां तिजला कुंठित करण्यास-फारसें प्रयास आणि मसलत कशास पाहिजे असें बोलून त्या कलवंतिणीस कचेरीस आणविली आणि विचारिलें कीं, त्वां खावंदां पाशीं काय मागितलें तें सांग.

केशला म्हणाली खावंदाचे गादीवर फरारवत करण्याचा हुकूम एकवार असावा. एवढेंच मागणें आहे. खावंदांनीं वचन दिलें असोन चारदिवस झाले तथापि अद्याप हुकूम होत नाहीं, त्यांस मागितलेलें देणें नाहीं असें तरीं सांगून मजला रजा द्यावी म्हणजे मी निघोन-जाईन. येथें खर्चखात किती दिवस बसावें याप्रकारें-तिनें भाषण ऐकून बिरबल म्हणाला खावंदांनीं वचन दिल्याप्रमाणें गादीवर फरारवत करण्याचा हुकूम दिला आहे. पण इरारवत नकरितां फरारवत स्वरूप करावी. इरारवत केली असतां शिरच्छेद केला जाईल. या प्रमाणें बिरबलाचें भाषण ऐकून कलवंतीण कुंठित होती-झाली. इरारवत केल्या शिवाय फरारवत फक्त करणें तर तसें होऊं शकणें नाहीं. या कारणानें ती भयाभीत आणि लज्जित होऊन तत्काळ उठून चालती झाली. तेव्हां

बिरबलाने अकलेची वहावा आणि प्रशंसा बादशाहा सह सर्वलोक विशेष करिने झाले. बादशाहाची प्रीती-आणि मेहेर दिवसें दिवस बिरबलावर वृद्धिंगत होत-चालली. त्याचा इनमाम आणि वेतन विशेष करून त्यास खुषी केलें.

केशला कलावंतीण तेथून निघून रुस देशाप्रत येती झाली आणि आदम बादशहास साकल्य वृत्त कळविलें तेव्हां त्याचे प्रधानानें सांगितलें कीं, दिल्लीचेंराज्य हस्तगत होणें दुर्लभ आहे. त्याचा प्रधान बिरबल अक्कलवान विशेष आहे याकरितां तो आहे तों पर्यंत सर्व मसलती व्यर्थ आहेत.

## गोष्ट ३री.

## अदव्यानें जोडलेलें इत्यादि ५ जिन्नस.

एके समयीं पंजाब देशींचा बादशहा फ़तनान नामक महाशूर आणि पराक्रमी तसाच अक्कलवान् पंजाब शहरांत राज्य करीत असतां त्यानें दिल्लीचे बादशहाची अक्कल ओळखण्या करितां युक्ती काढिली ती अशी कीं, अकब्बर बादशहास एक पत्र लिहिलें

कीं, आह्मांस पांच जिनसांची फार जरूर आहे तर पत्र पावतांच जिनसा पाठवून द्याव्या त्या अदव्यानें जोडलें १ पिठीचें मोडलें २ हातचें माणीक ३ बाजारची खाट ४ नरकाची वाट ५ येणें प्रमाणें पांचजिनसा एक महिन्यांत पाठवाव्या. नाहीतर युद्धास सिद्ध व्हावें असें पत्र लिहून सांडणी स्वारा हातीं दिल्लीचे बादशहा कडे पाठविलें. तें स्वारानें दिल्ली मुक्कामीं येऊन अकब्बराचे स्वाधीन केलें. त्यानें वाचून पाहिलें तों पांच जिनसा एक महिन्यात न पाठविल्यास युद्धास तयार व्हावें. याप्रमाणें पत्रार्थ पाहून विचारांत पडला कीं, पंजाबचे बादशाहा बरोबर लढाई देऊन आपला निभाव नाहीं तो बलवान् विशेष आहे. आपल्यास जिंकील यांत संशय नाहीं. यास्तव जिनसा पाठविणेंचीच तजवीज केली पाहिजे. असें म्हणून पिढीजादे दिवाण आणि कारभारी, तसेंच मंत्री आदीकरून सर्वांस हुकूम केला कीं, पंजाबचे बादशाहानें सांगितलेल्या पांच जिनसा पंधरा दिवसांत मिळवून सत्वर आणाव्या नाहींतर तुमचा शिरच्छेद केला जाईल. या प्रमाणें बादशाहाचा हु-

कूम ऐकून ते संपूर्ण लोक भयाभीत होते झाले.उपरां- त शहरांत आणि देशोदेशीं तसेच गावोगांवीं त्या पांच जिनसांची चौकशी करीत फटले.परंतु ते जिन्नस काय झाडास लागले आहेत ते अकलेचे जिन्नस असल्या मुळें त्या विचाऱ्यांस वाणी उदमी सौदागर आदिकरू- न उदमी लोकां जवळ कोठून मिळणार परंतु मूर्ख पणा- नें चौकशी करीत फरले. पंधरा दिवस पूर्ण भरले ए- काही जिनसेचा तपास लागला नाहीं. तेव्हां आणी- क आठ दिवसांची मुदत मागून घेतली. तीही सरत आ- ली तथापि जिनसा मिळेनात तेव्हां ते सर्व लोक बिर बलास शरण येऊन बोलते झाले कीं, आमचा प्राणां त संशय आला याकाळीं तूं बुद्धिमंत आमचें सौरक्ष- ण करण्यास समर्थ आहेस. त्वां जिनसा मिळवून दि- ल्या असतां पंचवीस सहस्त्र रुपये आह्मीं देतों. बिर बलानें याप्रमाणें त्यांचें दीन भाषण श्रवण करून त्यां स सांगितलें कीं, तुमचे प्राणाचा बचाव होईल असें करितों स्वस्थ असावें. असें सांगून बादशाहा जवळ येऊन बोलता जाहला कीं, पंजाबचे बादशाहा कडे जि-

नसा पाठविणें त्या त्याच देशाशिवाय अन्यस्थळीं नाहींत आणि त्या प्राप्त होण्यास दोन लक्ष रुपये लागतील ते देण्याची परवानगी होऊन जिनसा पोंचत्या करण्या विषयीं मजला हुकूम होईल तर मी जाण्यास सिद्ध आहें, चार महिन्याचे आंत जिनसा पोंचल्या बद्दल पावती आणून देतों असें त्याचें भाषण ऐकून बादशहानें तात्काळ दोन लक्ष रुपये आणि इतमाम खर्च त्यास पाहिजे त्या प्रमाणें देऊन बिरबलाची रवानगी करून दिली आणि जिनसा पाठविल्या आहेत म्हणून सुलतान बादशहा यास पत्र लिहून दिलें तें पत्र घेऊन बिरबल तेथून निघून पंजाब देशास येता झाला. पंजाब शहरांत एके जागीं बिऱ्हाड घेऊन राहिला. तंतर महिना पंधरा दिवस शहरांत हिंडून तेथील रीती स्थिती सर्व अवलोकनांत आणिली. तेथील लोकांनीं कोठील कोण म्हणोन विचारिलें असतां आपले बादशहाचें नांव न सांगतां पेशल खंडचे बादशहाचे दिवाण असें सांगता झाला. शहरांतील थोर सावकार लोक तसेंच सरदार आणि सभ्य गृहस्थ यांजकडे जाण्या येण्याचा पाठ हमेशा ठेविला.

त्या लोकास कधीं कधीं मेजवान्या करून त्यांचें मन संतुष्ट करिता झाला. आणि पेशल खंडचे बादशहा कडून तुमचे बादशहा कडे कांहीं सोयरिकीचे कार्यास्तव येथें येणें जाहलें आहे असें वर्तमान लोकांस सांगत असे. या प्रमाणें तेथें तीन महिने भरत आले उप्रांत एके दिवशीं साधा पोषाग करून दोन तीन मनुष्यें समागमे घेऊन घोड्यावर बसून प्रेमचंद्र नामें सावकार परम सभ्य आणि बहुता दिवशीं पिढीजादा असोन ज्याचा व्यापार थकत थकत मोडकळीस आलेला असा शहरांत रहात होता. त्याजकडे बिरबल जाता झाला. त्यास पाहून प्रेमचंदानें मोठा सत्कार करून बिरबलास आपले समीप बसविलें आणि विनयतेनें नम्र भाषण युक्त विचार पूस करिता झाला. त्या समयीं बिरबल म्हणाला शेटजी श्रवण करा आम्ही दूर देशींचे रहाणारे आहोंत. पेशल खंडचे बादशहा कडून तुमचे बादशहा कडे आलों आहों तुमचे बादशहानें आमचे बादशहाची कन्या आपले पुत्रास करण्याचें जमविण्यांत आणिलें आहे पण कांहीं हुंडा जाजती मागत आहेत तो आह्मीं क-

बूल केला म्हणजे ठराव झाल्या सारखाच आहे परंतु सध्या आमचा ऐवज सरला आहे एक लक्षाची हुंडी-यावयाची त्यास अवकाश पडला आहे. आठचार दिवसांत येऊन पोंचेल तों पर्यंत हुंड्याचा ऐवज देण्यास अवकाश नाहीं आजच कांहीं ऐवजाचा भरणा केला-पाहिजे तें न झाल्यास कार्य जमविण्यास आणि लेलें विघडत आहे. यास्तव आपण पिढीजादे संभावित-कार्य कर्ते जाणून विनंती करीत आहें कीं, आठ दिवस पर्यंत दाहा सहस्त्र रुपये आपण दिले पाहिजेत म्हणजे कार्य जमण्यांत येईल. व्याज व मनोती आपण सांगाल ती देण्यास कबूल आहें एवढी वेळ संभाळिली असतां मोठे उपकार होतील. इत्यादि संभाषणें बिरबलाचीं ऐकून प्रेमचंद सत्य मानिता झाला. आणि लोकांचे मुखानें ही ऐकिलें होतें कीं, कोणी पेशल खंडाहून सभ्य गृहस्थ आपले शहरांत आला आहे त्याजवरून त्यास तें सर्व सत्य भासून म्हणाला कीं, प्रसंगोपात एकमेकांचे उपयोगीं पडावें असा पुरुषांचा धर्म आहे. या गृहस्थाचें काम करणें अवश्य आहे असें जाणू-

न वहीवर बिरबलाचे नावें दहा सहस्त्र रुपये व्याज दरस-
दं त्यार आणे प्रमाणें लिहून रुपये रोख पदरीं घातले ते-
घेऊन बिरबल बिऱ्हाडीं येता जाहला.

दुसरे दिवशीं जव्हेर पेठेंत धनाशेट म्हणोन मोठा-
द्रव्यवान् सावकार थोडकेच दिवसांत वाढलेला मदोन्म-
त्त असा होता त्याची भेट घेण्या करितां बिरबलानें मोठा
भरजरी पोषाख करून अंगावर जड जवाहीर घालून
मोठे उत्कृष्ट घोड्यावर बसून दहा पांच सेवक मागें पुढें
अशा डामडौलानें धनाशेटीच्या घरीं आला कचेरीस -
सावकार बसला होता ते थें येऊन उभा राहिला तथापि
सावकारास दादही नाहीं कांहीं वेळानें धनाशेटीनें त्याज-
कडे पाहिलें तेव्हां उभयतांचा जयगोपाळ झाला. पण-
त्यास बसाही म्हटलें नाहीं. तेव्हां बिरबल म्हणाला शे-
ट साहेब माझें कांहीं बोलणें आहे तें परिसून घेतलें पा-
हिजे शेटजी म्हणाले क्षणभर दम धरा माझें हातचें काम
सरल्यावर बोलावें. नंतर एक घटिका जाहाल्यावर पुनः
बिरबल त्यांचे समीप गेला आणि प्रेमचंदास सांगितल्या
प्रमाणें आपली हकीकत त्यास सर्व कळविली. तेव्हां ध-

ना शेट म्हणाला ग्रहस्थहो तुमचा आमचा परिचय अगदींच नसोन दहा हजार रुपये मागता यास काय म्हणावें बिरबल म्हणाला शेट साहेब, प्रसंगोपान समयानुरूप आपलेकडे येणें भाग घडलें पंधरादिवस आमची नड आहे एवढी कृपा करून काढिली पाहिजे दहा पांच रुपये व्याज व मनोती ज्याजती घ्यावी. पण कार्य करण्यास आळस होऊं नये. अशी बिरबलाची फारच जिकीर ऐकिल्यावरून धनाशेट मनांत म्हणतो कीं, याचें अंगावर पांच चार हजारांचा विषय आहे. आणि याचें बिन्हाडही पाहिलें आहे तेथें दहा पांच हजारांचें सामान आहे त्यापेक्षां दहा हजार रुपये दिले तरी आपले पैशास बुड येण्यासारखें नाहीं आणि पंधरा दिवसांचीच मुदत असोन फायदा ही विशेष होण्या सारखा दिसतो असें मनांत आणून बिरबलास म्हणाला तूर्त पैसा देण्याची सोय नाहींच परंतु तुह्मीं फारच नड सांगतां यास्तव तजवीज पहातों. परंतु पंधरा दिवसांची मतोती व व्याज मिळोन दर शेंकड्यास पांच रुपये प्रमाणें अगोदर कापून घेऊन रुपये देण्यांत

येतील पण साक्षी स्वदस्तूर कागद लिहून दिला पाहि-
जे. बिरबल म्हणाला शेट साहेब आपण व्याज मनो-
नी व्याजनी घातल्यानें दुःख नाहीं अडचणीचे समयीं-
उपयोगीं पडलांत हेच उपकार फार आहेत आमचे बा-
दशहा जवळ तुमची बदती विशेष होईल-इत्यादि त्या-
स मोठेपणा देऊन त्याने म्हटल्या प्रमाणें सर्व कबूल-
करून साडे नऊ हजार रुपये पदरीं घेऊन बिरबल बि
ऱ्हाडीं येता झाला.

तिसरे दिवशीं त्या शहरांत एक जनवंती नामें
कलवंतीण परम सुंदर आणि एकवचनी नीतियुक्त उ-
त्तम रीतीनें वर्तणारी अशी रहात होती तिचे घरीं आ-
पले सेवका बरोबर पंचवीस रुपये पाठवून दिले आणि
तिजला सांगितलें कीं, आजची रात्र तूं आमची आहेस
असें सांगून पाठविलें त्या प्रमाणें तिनें कबूल करून रा-
त्रौ येण्या विषयीं सांगून पाठविलें. नंतर अस्तमान ज-
हा त्या पासून ती जनवंती, पुरुष येणारा तो आपला प-
तीच असें मानून हमेशा त्याचे सेवेस तत्पर असण्या-
चे रीती प्रमाणें रंगमहालीं उत्तम प्रकारें आरास आ-

णि मंचकावर सुंदर शय्या तयार करून विडे पान सुपा-री आदीकरून सर्व विषय पदार्थ तयार करून बिरबला ची मार्गप्रतिक्षा करीत बसली. मध्यरात्र जहाल्या नंतर बिरबल एकटाच तेथें येता झाला तों अपरात्र जहाली यामुळें तिजला किंचित् निद्रा लागली यामुळें सामोरी आ-ली नाहीं. हाक मारून द्वार उघडण्यास क्षणेक अवकाश पडला हांक ऐकण्या बरोबर जागृत होऊन सामोरी येती झाली. आणि त्यास हातीं धरून स्नेहयुक्त रंगमहालां त घेऊन गेली. तिची परीक्षा पहाण्या करितां बिरबला नें तिजवर निजल्याचा टपका ठेवून अपराधास्तव खि-शांतील कोर्डा काढून तिच्या पाठीवर पंचवीस कोर्डे मा-रिले परंतु ती सत्य धर्मानें चालणारी तिणें त्याचा खेद न मानितां पदर पसरून अपराध बक्षीस मागून म्ह-णाली कीं, महाराज मी आजची रात्र आपली काया-तुह्मास अर्पण केली आहे. आपले चित्तास वाटेल तें करावें, मी अन्यायी आहें इत्यादि प्रकारें दुःख सहन करून विनंती करिती झाली. त्याकाळीं बिरबलास ति-चे नियम धर्मा विषयीं विस्मय वाटता झाला. मग अव-

घी रात्र तेथें क्रमोन प्रातःकाळीं बिऱ्हाडीं येता झाला.

चवथे दिवशीं सायंकाळीं बिरबल घोड्यावर बसून शहरांत हिंडत असतां बाजारांत एका वेश्येच्या माडी खालीं घोडा उभाकरून तिजकडे पहाता झाला. तेव्हां ती वेश्या महा कपटी आणि धूर्त होती तिणें तो गृहस्थ श्रीमान् अनभ्यस्त पाहून त्यास फसवून द्रव्य हरण करावें; या हेतूनें त्यास नेत्र इशारा करून माडीवर येण्या विषयीं खुणाविलें तेव्हां मोतन् दारा जवळ त्यानें घोडा देऊन तिच्या माडीवर गेला आणि तिजशीं बोलता जहाला कीं, नायकजी तुमचे मंदिरीं एकरात्र करमावी असा मानस आहे. त्यास तुमचा ठराव कसा काय आहे तो समजला पाहिजे याप्रमाणें भाषण ऐकून तिनें विचार मनांत आणिला कीं, हा गृहस्थ कामासक्त अत्यंत उल्लु असोन अनभ्यस्त गैर माहीत आहे याचे अंगावर दोन हजारांचा सुमारें विषय आहे. एतद्बुद्धीनें हस्तगत केला पाहिजे, असें मनांत आणून बोलती जहाली कीं, महाराज, माझा एकरात्रीचा ठराव पांच रुपये घेण्याचा आहे मग आपण यज-

मान समर्थ अहांत कायद्याल तेवढें च घेण्यास कबूल आहें असें बोलून विडाकरून देती झाली. तेव्हां दहा रुपये तिजला देऊन बिरबलानें सांगितलें कीं, आज मी प्रहर रात्री नंतर तुझ्या येथें येईन असें सांगून ते-थून निघोन बिऱ्हाडीं आला. उपरांत प्रहर रात्रझाल्या वर त्या वेश्येचे घरीं एकटाच निघोन आला. तो रंगम-हालाचे माडीचें द्वारबंद पाहिलें यास्तव तेथेंच बसून. राहिला त्यासमयीं आणीक दोन चार यजमान तिणें-बलाविले होते त्यांजपासून द्रव्य घेऊन त्यास संभोग-देऊन वाटेस लाविले आणि दुसरे चारअसामी सांगे धून मदतीस बोलाविले होतेतेथे नांव त्यांस मसलत सांगितली कीं, येथें एक गृहस्थ येणार आहे तो सां-प्रत खालीं बसला आहे त्याजला मी महालांत आणि-नें आणि तुह्मांस येऊन संकेत केल्या बरोबर तुह्मीं त्या-स धरून त्याचे आंगावरील सर्व चीजवस्त लुटोन-घ्यावी. अशी मसलत त्यांस सांगून एकीकडे गुप्त बस-विले आणि आपण खालीं येऊन बिरबलास ह्मणा-ली महाराज आपण एथें काय बसलेत द्वार उघडण्या

विषयीं मजला हांक मारावी होती कीं नाहीं, बिरबल म्हणाला पुष्कळ हांका मारिल्या तो म्हणाली मला-किंचित् निद्रा लागली होती अशी संपादणी करून त्यास महालांत आणिलें. उप्रांत संभोगा शिवाय कोर्डे विलास पानसुपारी इत्यादि झाली. नंतर कांहीं निमित्त करून बाहेर आली आणि आपले सख्यांस संकेत केला तेव्हां ते तत्काल येऊन बिरबलास धरिते झाले आणि त्याचे अंगावरील सर्व विषय काढून घेऊन-वेश्येचे हवालीं केला. नंतर ती वेश्या रस्त्यांत येऊन शंख ध्वनी करून गस्तीचे लोकांस हांका मारून म्हणू लागली कीं, माझे घरांत चोर शिरून मजला मारीत असतां मी पळून जीव बचावून धांवत आलें. सांप्रत-तो घरांत आहे त्यास सत्वर धरावें असें राज सेवकांनीं तिचें भाषण ऐकतांच धांवून तिच्या घरांत आले आणि बिरबलास धरून तत्काळ मुसक्या बांधून चावडीवर घेऊन गेले. नंतर प्रातःकाळीं बादशहास बर्दी दिली कीं, रात्रीं चोर धरून आणिला आहे त्याचें शासन करणें तो हुकूम व्हावा. तेव्हां बादशहानें त्या-

ची चौकशी न करितां एकाएकीं सुळीं देण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें सेवकांनीं त्या चोरास सुळीं देण्यास गांवाबाहेर चालविलें त्यासमयीं बिरबल त्या सेवकांस म्हणूं लागला कीं, तुह्मां प्रत्येकास दहा दहा रुपये देतों ते घेऊन माझी एवढी गोष्ट ऐकावी कीं, धनाशेटीचे घराकडून मजला न्यावें त्याचे जवळ दोन भाषणें बोलावयाचा हेतू आहे नसेंच प्रेमचंदाचे घराकडून ही मजला न्यावें असें त्याचें भाषण ऐकून सेवकांनीं कबूल करून धनाशेटीचे द्वारापुढें त्यास आणिलें तेव्हां धनाशेटीस बिरबल हाका मारून समीप बोलावून म्हणाला शेट साहेब, मला विनापराध प्राणांत शिक्षा बादशाहानें योजिली तत्राप त्याचें दुःख नाहीं पण आपलें देणें राहिलें हें फार दुःख वाटत आहे त्यास आपली दोन हजार रुपये मजसाठीं बादशाहास देण्याचें कबूल करून मजला सोडवावें म्हणजे आपले सर्व पैशाची नजवीज निघोन येईल असें न होईल तर दिलेला सर्व पैसा बुडणार. याप्रकारें त्याचें बोलणें ऐकून सावकार अत्यंत क्रोधायमान होऊन म्हणाला

चोरी कर्म करणारे तुह्मीं गृहस्थ डामडौल दाखवून भस- लतीनें माझा पैसा काढून नेला त्याचें फळ लौकरच प्रा- प्त झालें आतां जो माझे प्रारब्धानें हात गुंतला गेला त्या- स इलाज नाहीं पुढें आणीक दोन हजार रुपये डोहांत टाकण्याचें शहाणपण बरेंच शिकवीत आहां कीं हो इ- त्यादि त्याची निर्भत्सना करून बोलता झाला. आणि म्हणाला कीं, तुझें पूर्वजन्मींचें देणें लागत असेंन तें फे- डिलें आतां माझे दारांत ही उभा राहूं नको असें मोठ्या संतापानें बोलून बुडालेले द्रव्यासाठीं रडत बसला. नंत- र राजदूतांनीं त्या गुन्हेगारास पुढें घालून तेथून प्रेमचं- द सावकाराकडे आणिलें त्याचे समोर बिरबल रुदन क- रून बोलता झाला कीं, महाराज शेट साहेब मजवर तर प्राणांत समय गुजरला तो प्राक्तनानुसार घडोन आ- ला त्यास इलाज नाहीं आणि त्याचा इतका शीण ही ना- हीं परंतु माझा व आपला परिचय मुळींच नसोन आप- ण माझे कार्यास साह्य होऊन दहा हजार रुपये दिले. ते बुडण्याचा प्रसंग आला हें दुःख मरणाही पेक्षां मज- ला दुस्तर विशेष वाटतें आजचा दिवस अवकाश असता

तर आमची पंचवीस हजार रुपयांची हुंडी दाखल झा-
ली असती परंतु तें बोलून सार्थक नाहीं तथापि आपण
कृपाकरून धैर्ययुक्त व्हाल तर आपला पैसा-
ही परत होऊन माझा प्राण वांचेल मजला विनापराधी
बादशहानें प्राणांत शिक्षा नेमिली आहे यास्तव दरबार
खर्चास आणीक दोन हजार रुपये आपण खर्च कराल
तर सर्व विघ्नें टळतील. या प्रमाणें त्याचें दीनवत भाषण
ऐकून प्रेमचंद यास फार वाईट वाटून नेत्रीं अश्रू आणून
म्हणाला माझे प्राक्तनानुसार माझी द्रव्य हानी झाली त्या-
स काय करणार परंतु हा सभ्य गृहस्थ सर्वोत्कृष्ट मोहोरा
असोन प्राणा निशीं जातो हें तर फारच अनुचीत आ-
णि वाईट होत आहे आतां यास काय करावें माझाही
चालना काळ नसोन दोन हजार रुपये आणखी खर्च
करण्यास सामर्थ्य नाहीं तथापि या गृहस्थाचा प्राण-
वांचण्या करितां पैशाची तजवीज जाहाल्यास करून-
पहावी. असें मनांत आणून राजसेवकांस क्षणभर स्थि-
र असण्या विषयीं विनंती करून घरांत जाता झाली आ-
णि आपले स्त्रीस सर्व मजकूर कळवून म्हणो लागला -

जसे दहा हजार रुपये बुडाले तसे आणीक दोन हजा-र बुडवून या गृहस्थाचा प्राण सोडवावा. नंतर आपला पैसा प्रारब्धानुसार येणें असेल तर येईल याजकरितां तुझे अंगावरील दागदागिने दोन हजारांचे - काढून द्यावे असें पतीचें बोलणें ऐकून ती महा साध्वी पती मनोगतानुसार चारिणी परोपकारिणी किंचित् ही अनुमान न करितां दागिने काढून देती झाली ते प्रेमचंदानें घेऊन राज दूतांस कांहीं द्रव्य देऊन एक-घटिका भर या गृहस्थास सुळीं देण्याचें महकूब करावें म्हणोन सांगोन आपण बादशहाचे कचेरीस गेला आणि बादशहास अर्ज केला कीं, कोणी गृहस्थास आज सुळीं देण्याचा हुकूम जाहला आहे पण त्याचे गुन्ह्याची चौकशी कांहींच झाली नसोन प्राणांत शिक्षा नेमिली यास्तव त्याची चौकशी होऊन गुन्हा त्याजवर लागू झाल्यास त्याज बद्दल खावंद दंड मागतील तो मी देईन याप्रकारें प्रेमचंदाचें बोलणें ऐकून बादशहानें त्या गुन्हेगारास कचेरीस आणण्याविषयीं सेवकास फार जरूरीनें हुकूम केल्यावरून-

तत्काळ त्यानीं जाऊन बिरबलास परत आणून बादशहाचे समोर उभा केला. त्या काळीं गुन्हेगार जो बिरबल त्यानें अकब्बरानें दिलेलें पत्र काढून बादशहाचे पुढें टाकिलें तें त्यानें वाचून पहातां मजकूर पांच जिनसा पाठविल्या आहेत पोंच त्याचा जबाब सत्वर पाठवावा असें लिहिलें होतें त्याजवरून बादशहा विचारिता झाला कीं, जिनसा कोठें आहेत तेव्हां बिरबल म्हणाला धनशेट सावकार आणि जनवंती कलावंतीण आणि बाजारची वेश्या जिणें एवढा प्रसंग आणिला ती इतक्यांस येथें घेऊन यावें म्हणजे जिनसा तयार आहेत. या प्रमाणें ऐकून बादशहानें सेवक पाठवून त्या तिघांस ही तेथें त्यासमयीं आणिलें. बिरबल म्हणाला, महाराज आपले जिनसां पैकीं पहिली जिन्नस (अदव्याचें जोडलें) तो हा धनाशेट मदोन्मत्त रीत सोडून अन्याय कर्मानें पाहिजे तसा पैसा मिळविणारा स्वल्प दिवसांत कोटयाधीश अन्यायोपार्जित धनानें मस्त जहाला; दुसरी जिन्नस (पिढीचें मोडलें) तो हा प्रेमचं-

हू सावकार यथान्यायें द्रव्य संपादन करून उत्तमरी तीनें लीननेनें वागणारा याचा माझा लेशाही परिच य नसोन यानें दहा हजार रुपये माझे अडचणीस्तव दिले आणि माझा प्राणांत समय मांडला तेव्हां दहा हजारावर पाणी सोडून माझा प्राण वांचविण्या साठीं आणीक दोन हजार रुपये खर्च करण्यास सिद्ध होऊ न कचेरीस प्रत्यक्ष ऐवज आणिला आहे. आतां नि सरी जिन्नस ( हातचें माणीक ) ही जनवंती कलवंती ण पतिव्रता एकवचनीं सुनीतीनें सुधर्मानें वर्तणारी एका पुरुषाचा प्रथम विडा घेतल्यावर दुसरे पुरुषानें हजारों रुपये देऊं केले तथापि त्यास राजी न होतां प्र थम पुरुष तो त्याराञीच्या ठायीं आपला पतीच असें मानून अवघी रात्र पतिव्रता धर्मान्वयें त्याची सेवा क रून त्याचे आज्ञेंत असणारी ही जनवंती हातचे माणी क होय हें असत्य वाटेल तर प्रत्यक्ष पहा तिच्या पाठी वर मी पंचवीस कोरडे किंचित अन्यायास्तव मारिले प रंतु त्यानें दुःख लेशाही न मानितां तिनें सहन केले ते प्रत्यक्ष पाठीवर वळ उमटलेले खावंदांनीं पहावे तेव्हां

तिची पाठ बादशहानें पाहिली. तों साग्र वळ दृष्टीसपड- ले. आतां चवथी जिन्नस (बाजारची खार) ही वेश्या पहा हिचा एकरात्रीचा ठराव पांचरुपये घ्यावयाचा अ- सोन मी दहा रुपये दिले आणि तिच्या घरीं रात्रीं गेलों. असतां मजला द्वारउघडून महालांत न घेतां पांच च्यार पुरुषां पासून दहा पांच रुपये घेऊन त्यांस संभोगदेऊ- न चालते केले नंतर मजला रंगमहालांत घेऊन गेली आणि माझे अंगावर हजार दोन हजारांची चीजवस्त हो- ती ती लुटून घेण्यास चार सोदे जमाऊन त्यांचे हातून स- र्वस्व हरण करून घेतलें आणि आपणच रस्त्यांत येऊन शंख ध्वनी करून गस्त वाले यांजकडून मला रूबद्ध क- रविलें आणि प्राणांत समय प्राप्तझाला या प्रमाणें बाद- शहानें ऐकून त्या वेश्येस पलाखनी मार दिल्यावर खरा प्रकार झालातो तिणें सांगितला तेव्हां सर्व कचेरीची खा- त्री होऊन गेली. उपरांत बिरबल म्हणाला. आतां पांच वी जिन्नस (नरकाची वाट) गुन्हेगार खरा किंवा खोटा हें राज्याधिकारी यानें न पहातां त्यास मोठी किंवा लहा- न शिक्षा देणें हीच नरकाची वाट. याप्रमाणें पांच जि-

नसा पटल्याचा जबाब अकब्बर यास पत्रीं लिहून द्याव्या या प्रमाणें बिरबलानें अर्ज करून उभा राहिला.

सुलतान बादशहा आणि त्याचे प्रधान तसेच वजीर उमराव आदी करून संपूर्ण लोक बिरबलाचे अकले विषयीं आश्चर्य मानून थक्क होऊन राहिले. त्याकाळीं बादशहानें बिरबलास मुक्त करून उत्तम वस्त्रें आणि उत्तम अलंकार देऊन कचेरींत आपल्यास मीप मोठे सन्मानें करून बसविलें. प्रेमचंद सावकार यास सभासद पणाचा अधिकार देऊन वेतन आणि इनमाम खर्च चालू केला. जनवंती कळवंतिणीस संपूर्ण कलावंतिणींत नायकी देऊन वेतन चालू केलें वेश्येचें घरदार लुटोन निजला हांकून दिली. धनाशेटीचे मुद्दल सपये देऊन त्यास कचेरींत येणें वर्ज करून तत्काळ उठवून लाविला. प्रेमचंदाचे रुपये व्याज सुद्धां आणि धनाशेटीचे उसने याप्रमाणें बादशहानें आपले तिजोरींतून दिले बिरबलाचा सत्कार करून जिनसा पावल्याचा जबाब अकब्बरास पत्रीं लिहून बिरबलाची रवानगी करिता झाला. नंतर बिरबल दिल्ली शहरांत येऊन

अकब्बरास पत्र देऊन साकल्य वर्तमान निवेदन क- रिता झाला. त्याकाळीं अकब्बर बादशहाची मर्जी अत्यंत सुप्रसन्न होऊन बिरबलास सर्वाधिकार प्रधानत्व मोठा उत्साह करून देता झाला.

अकब्बर राजा आणि बिरबल प्रधान असा- एक मिलाफ संयोग पूर्वजन्मींचे उभयतांचे हेतू प्र- माणें होतांच उभयतांस पूर्वजन्मीचें स्मरण होते- झालें आपण कोण होतों आणि मोठे पदवीस कशा नें आलों हें सकळ स्मरण होऊन परस्परांच्या खुणा एकमेकांनीं जाणल्या नंतर उभयतांनीं विचार क- रून पूर्वजन्मीच्या खुणा आणि प्रत्यय पहाण्या क- रितां उभयतां ही प्रयागास येते झाले आणि काषा- यवस्त्रें व धोकटी ज्या वृक्षा समीप पुरून ठेविली हो- तीं तीं उकरून पहातां ठेविल्या प्रमाणेंच निघाळीं आणि एक वृद्धा तेथें समीप रहात होती तीही तशी- च कार्इम पाहून विस्मय करिते झाले कीं, ही वृद्धा पू- र्वजन्मीं पाहिली होती त्यास पंचवीस वर्षे सुमार झा लीं असून तशीच अद्याप ही सदृढ कशी राहिली म्ह-

पून वारंवार आश्चर्य करिते झाले. नंतर ती पूर्वी कां-
हीं उपयोगीं पडली होती यास्तव तिजला धनधान्य ब-
हून अर्पण केलें तें तिणें ग्रहण करून तिचा नित्य धं-
दा होता तो सोडून स्वस्थ हर्षयुक्त बसून म्हणती जहा-
ली कीं, आजपर्यंत दरिद्र योगानें उदर निर्वाहास्तव अ-
हो रात्र धान्य दळीत असतां एक पळभर ही हातचा खुं-
टा सुटला नाहीं परंतु सुप्रभ स्वामीचे प्रसादें करून
सांप्रत दरिद्ररहित झाल्यें असें आनंदयुक्त बोलती-
झाली. तें उभयतांनीं श्रवण करून पूर्वजन्म वृत्त प्र-
त्यक्ष सत्य मानिते जहाले. त्या वृद्धेस आणखी विचारि
लें कीं, तुमचे जन्मास वर्षे किती झालीं असतील तें त्यां
नी म्हणाली कीं, सवाशें वर्षांचे सुमारास मी सुप्रभ स्वा-
मीचा अनुग्रह घेतला त्यास आलीकडे पंचवीस तीस-
वर्षे जहालीं असतील इतकें माझें वय आहे या प्रमा-
णें सांगती झाली. तिजला धनधान्य मिळाल्या योगा-
नें त्यादिवशीं कामधंदा कांहीं न करितां स्वस्थ बसती-
झाली. तेणें करून त्यादिवशीं तिला निद्रा येऊं लागली
त्यास्तव निद्रागत झाली तों पंचप्राण निघोन गेले हें कु-

त्या बादशहानेंथें असतांच घडलें तेव्हां बिरबलास-
बादशहानें विचारिलें कीं, दीडशें वर्षे वृद्धा कशी वांच-
ली आणि आज एका एकींच कशानें मृत्यु पावली. हें
तूं बुद्धीचे तार्किक्यानें सांगण्यास योग्य आहेस बिर-
बल म्हणाला वृद्धेस उदर निर्वाहास धनधान्य नसल्या
मुळें प्रत्यहीं निर्वाहास्तव दिवसास मोल मजूरी करीत
असे तशीच अवघी रात्र दळण दळीत असे त्या योगा-
नें अहो रात्रींत निजला निद्रा नसल्यामुळें आयुष्य-
वृद्धिंगत पावोन दीडशें वर्षे वांचली सांप्रत आजचे दि
वशीं धनधान्य विपुल असल्यामुळें धंदा करण्याचें प्र-
योजन राहिलें नाहीं. त्या योगानें निद्रा येऊन तत्काळ-
मरण पावली. तेसमयीं उभयतांनीं विचार केला कीं,-
आपण कर्वतीं देहपात केल्यानें उत्कृष्टस्वर्गप्राप्त पावलों
या प्रमाणेंच आणीक लोक करतील तर समयानुसार-
आपले राज्यास अपाय होईल यास्तव त्या कर्वताचा उ-
च्छेद केला पाहिजे असा विचार ठरवून कर्वतस्थानीं-
गंगायमुनेचा ओघ होता तो फिरविण्या स मोठा यत्न क-
रून कर्वताचा नाश केला नंतर उभयतां दिल्लीस येऊन

राज्य करिते झाले.

## गोष्ट ४थी.

## बेटा रोताथा याविषयीं.

एके दिवशीं बादशहा कचेरीस येऊन बसला असतां सभासद आणि वजीर उमराव इत्यादि सर्व लोक मिळाले परंतु बिरबलास येण्यास कांहीं कारणानें अवकाश लागला तेव्हां बादशहास क्रोध येऊन दोन तीन बोलावणी पाठविलीं. तरीं आला नाहीं. चौथ्यानें मोठ्या निकरानें चोपदार आणावयास पाठविला. तेव्हां हातचें काम ठेवून सत्वर कचेरीस येऊन बादशहास वंदन करून उभा राहिला. त्यास पाहून बादशहा म्हणाला इतका उशीर कां? कोणते कामांत गुतला होतां. बिरबल म्हणाला बेटा रोताथा उसका समज करताथा. बादशहा म्हणाला तूं असत्य बोलत आहेस कशास पाहिजे प्रियपदार्थ मागेल तो दिला म्हणजे समज झाली. बिरबल म्हणाला मुलाचा समज कसा करावा लागतो हें खावंदांस अद्याप माहीत नाहीं. तेथें मी काय सांगावें बादशहा म्हणाला मी एका क्षणांत समज केली असती बिरबल म्हणाला खावंद मायबापच होत तस्मात् मी

लरका होनों आणि खावंदांनीं माझा समज करावा. असें ऐकून तें बादशहानें कबूल केलें त्यासमयीं बिरबलानें लहान मुलाचा पोषाख असतो त्याप्रमाणें आंगडें टोपडें कुंची घालून हलू हलू रोदनास आरंभ केला तेव्हां बादशहा जवळ येऊन म्हणाला बेटा, कायको रोते तेव्हां अधिकच रूदन करीत लोळण घातली. बादशहानें त्यास उठवून आपले जवळ बसवून आंगावर हात फिरवून म्हणाला बेटा तूं कायकों रोता कहांदे तुझ्येकूं क्या चय्येसो मांगले तथापि लरका कांहींच न बोलतां हुंहुं हुंहुं असें मंद मंद रोदन करीत असतां एक घटिका गुदरली उपरांत म्हणाला मुझे कों गांडा चय्ये. असें म्हणतांच उसाचें एक ओझें तेथें आणविलें त्यांतून हा नको तो नको असेंच चाळविलें शेवटीं एक पक्करिला तो हातीं घेऊन पुनः हुं हुं करून रुदन करूं लागला तेव्हां बादशहा म्हणाला बेटा अब क्यों रोता तंतर अर्धि घटकेनें बिरबल म्हणाला वो छेलके सफा करदे तेव्हां सोलून हातीं दिला तरी पुनः रडना राहीं तेव्हां बादशहा म्हणाला - आब क्यों रोते बिरबल म्हणाला गंडोऱ्या करदे असें म्ह-

णनांच गंडोऱ्या करून दिल्या. पुनः रडत म्हणूं लागला मेरे टोपीमें बंदकर दे. त्याप्रमाणें टोपींत बांधून दिल्या. नंतर पुनः रडूं लागला आणि गंडोऱ्या सोडून फेंकून दिल्या व लोळण घातली तेव्हां बादशहा आणखी उठून त्यास हातीं धरून गंडोऱ्या गोळाकरून पुढें ठेविल्या. आणि म्हणाला बेटा तूं सांगत गेल्या प्रमाणें तसें तसें केलें आतां कां रडतोस तेव्हां आणखी पाव घटिका हुंहुं करीत रडत असून बोलता झाला कीं, मेरा पहिला जेसा गंडाथा वेसा फेरकर दे. असें बोलून रुदन करूं लागला. तेव्हां बादशहा म्हणाला आणखी दहा पांच ऊंस घे पण ज्याचे तुकडे झाले तो पुनः पहिले सारखा होणार नाहीं बिरबल म्हणाला पहिला होता तसा करून देत नाहींस तर मग मी रडत आहें तो कसा समजेल या प्रमाणें बादशहानें ऐकून म्हणाला बिरबल तूं म्हणतोस तें खरें आहे लरकेका समज होनेका मुष्कल है. असें बोलून मनांतील क्रोध शांत करिता झाला. नंतर कचेरी बरखास्त झाली.

## गोष्ट ५वी.

## इंद्र बडा के हम बडा.

एके दिवशीं बादशहा सर्वांचे अगोदर कचेरीस येऊन बसला आणि जो कोणी येई त्यास असा सव्वाल करता झाला कीं, इंद्र बडा के हम् बडा असा सव्वाल करीत असतां हजारों लोक कचेरीस आले परंतु तितक्यांतून कोणा एकाची जबाब देण्याची अक्कल चालली नाहीं इंद्र बडा म्हणावा तर बादशहास क्रोध येणार, बादशहा बडा म्हणावा तर इंद्राचे लक्षांशे करून ही याचें वैभव नाहीं. तथापि मर्जीखातर म्हटलें असतां कसा बडा म्हणोन विचारलें तर काय सांगावें. अशी दोहीं कडून अडचण यास्तव कोणीही जबाब न देतां तसेंच मौन्य धरून कचेरीस जाऊन बसते झाले. शेवटीं अवघ्यांचे मागून बिरबल आला त्यास पाहून बादशहा म्हणाला हम् बडा के इंदर बडा. याप्रमाणें ऐकून हात जोडून बिरबल म्हणाला खुदावंत सुनो इंद्रसे आप् बडे हो तेव्हां बादशहा म्हणाला हम् कैसा बडा सो कहदे बिरबल म्हणाला संपूर्ण सृष्टीचा कर्ता ब्रह्मदेव त्या ब्रह्मदेवानें इंद्राचा पुतळा आणि खावंदांचा पुतळा असे उत्पन्न करून दोहोंत अधीक कोणता हें पाहाण्या करितां अत्यंत मो

ठी विस्तीर्ण तुळा म्हणजे तराजू आणून दोहीं पार्श्वां त दोघांस घातलें तेव्हां इंद्रापेक्षां खावंद फार जड भरले त्यामुळें खावंद ज्या पार्श्वांत बसले होते तें पारडें खालीं पृथ्वी तळास बसलें आणि इंद्र खावंदां पेक्षां कमी म्हणून तें पारडें हलकें यास्तव उंच वरती गेलें तेव्हां ब्रह्मदेवानें स्वर्गावरील राज्य इंद्रास दिलें आणि भूतळीं तें राज्य खावंदास दिलें म्हणून इंद्रापेक्षां खावंद बडे आहेत यांत संशय नाहीं अशा युक्तीनें बादशहाचें समाधान करून दोन्हीं सूचविलीं उंचस्थान इंद्राचें आणि अधोस्थान नीच तें तुझें असें दर्शविलें म्हटलें आहे.

ऊर्ध्वंगच्छंति सत्वस्था मध्येतिष्ठंतिराजसः
जघन्यगुण वृत्तिस्था अधो गच्छंति तामसः

तपस्येच्या बळानें सत्वस्थ पुरूष स्वर्गादिक ऊर्ध्वलोक अशा स्थानाप्रत जातात राजस मध्यस्थानीं आणि तामस अधो लोकाप्रत जातात. याप्रमाणें दोन्हीं बिरबलानें सूचविलीं परंतु बादशहानें लक्ष तिकडे न पुरतां आपणं इंद्रापेक्षां मोठा आहें असें समजून बिरबलास शाबासकी देऊन त्याची बदनी करविता झाला.

## गोष्ट ६ वी.

## सबूसे प्यारा क्या.

एके दिवशीं बादशहा कचेरीस बसला असतां त्याचा पुत्र दोन वर्षांचा परम प्रिय मांडीवर बसला असतां त्याज पाशीं बादशहा कौतुकें करून क्रीडन हांसत असतां कचेरीस लोक येणारे त्यांस विचारिता झाला कीं, सबूसे प्यारा क्या पदार्थ है. असें ऐकून सर्वांनीं विचार केला कीं, बादशहाचे सवालाचा जबाब नेहेमी बिरबल देतो तो बादशहास सत्य वाटून त्या प्रमाणें अनुभवास ही येतें तेणें करून बिरबलावर बादशहाची मर्जी खुष होते आज सवालाचा जबाब आपण देऊं म्हणजे आपलेवर मर्जी प्रसन्न होईल असें म्हणून अनेक प्रकारचे तर्क काढिते झाले त्यांत बादशहा लडक्या जवळ खेळत आहे त्या पेक्षां त्याचे मनांत बेटा प्यारा हेंच आहे असा अवघ्यांनी सिद्धांत ठरवून जबाब दिला कीं, सबसें प्यारा बेटा होय. ते ऐकून बादशहा सत्य मानिता झाला. तों इतक्यांत बिरबल कचेरीस आला त्यासही बादशहानें तोच सवाल केला तेव्हां बिरबल म्हणाला सबूसें प्या-

रा आपना आपना जीव हे. जीवसें प्यारा और कुच भी नहीं. बादशहा म्हणाला सबूसे प्यारा बेटा है तूं जीव प्यारा म्हणतोस तर कसा प्यारा याचा प्रत्यय दाखवून दे तेव्हां बिरबल म्हणाला बचे वाली माकडी बच्या सहीत एक आणवावी आणि पाण्याचा हौद भरला आहे हा कोरडा करवावा नंतर अनुभव दाखवितों असें ऐकतांच बादशहानें पिल्यासहित एक माकडी आणविली आणि हौदांतील पाणी काढविलें नंतर पिलासहितमाकडी बिरबलानें त्यांत सोडून पाण्याचानळ हौदांत सोडिला. पळापळानें हौदांत पाणी वाढत चाललें तेव्हां माकडीनें पिल्यास आपले जवळ घेतलें. जसें जसें पाणी वाढत चाललें तसें तसें त्यापिल्यास माकडी उचलून खांद्यावर डोकीवर अशी वरवर घेती झाली. पायांवर उभी राहिली तों पाणी गळ्या पर्यंत चढलें तेव्हां पिल्यास हातावर घेऊन उंच उचलून घेती जाहाली तेव्हां बादशहा म्हणाला बिरबल पहा माकडी पिल्याचा प्राण कसा वांचवीत आहे बेटा प्यारा सच्चा हे कीनहिं बिरबल म्हणाला महाराज, क्षणभर धीर धरा. जिवावर प्रसंग गुदरेल तेव्हां कळेल

येईल असें बोलत आहेत तों माकडीच्या तोंडांत पाणी-जाऊं लागलें तथापि तिणें पिल्यास दुःख होऊं दिलें नाहीं. जेव्हां नाकांत आणि तोंडांत पाणी जाऊं लागलें गुळणी-टाकण्यास सवड नाहीं. जीव गुदमरून कासावीस झाला प्राण जाण्याचा प्रसंग आला त्यासमयीं माकडीनें पिल्या ची ममता आणि आस्था सोडून आपला प्राण वांचवि-ण्या करितां त्या पिलास पायांखालीं दडपून आपण त्या-जवर उभी राहिली तेव्हां बादशाहास बिरबल म्हणा-ला खुदावंत बेटा प्यारा कीं जीव प्यारा आहे हें पहा आ-पले जिवावर प्रसंग नाहीं तोंपर्यंत सर्व प्रिय आहे या प्रकारें प्रत्यक्ष प्रत्ययास आणून दाखविलें तेव्हां बा-दशहा सहीत सर्व लोकांची खात्री होऊन गेली कीं, बिरबलाची अक्कल सर्वांहून आगळी होय.

## गोष्ट ७वी.

## अल्लाके हातसें नाहोनेका सोहम् करे.

एके दिवशीं सर्वांचे अगोदर बादशहा कचेरीस येऊन बसला. आणि जो मनुष्य कचेरीस येई त्यास स-व्वाल करिता झाला कीं, ((अल्लाके हातसें काम होनेकी

मुष्कल सो हम् करेगा क्यों नहि. याप्रमाणें सव्वाल करीत असतां त्याचा जबाब देण्याची मती कोणाची न चालून मनांत म्हणत कीं, बादशहा मूर्ख आहे काय? जें देवाचे हातून काम व्हावयाचें नाहीं तें याच्यानें आणि याचे सप्त पुरुषांचे हातून तरी होईल काय? या मूर्खपणास काय म्हणावें याचा जबाब बिरबल तरी काय सांगणार आहे? बरें असो आतां काय होईल तें दृष्टीस पडेल असें म्हणून कांहीं जबाब न देतां कचेरीस येऊन बसते झाले तों इतक्यांत बिरबल आला.- त्यास पाहून बादशहा म्हणाला सुनो बिरबल अल्ला के हातसे काम होनेका नहि सो हम् करेगा क्यों नहि. असा सव्वाल ऐकून बिरबल म्हणाला खुदावंत यांत संशय कशास पाहिजे एक वस्त्र सोडून सात वस्त्र ही खावंद करतील बादशहा म्हणाला बिरबल उगाच हो यास होय देण्याचें काम नव्हे अल्लाच्यानें न होणारें तें मी कसें करीन बिरबल म्हणाला संपूर्ण सृष्टीचा राजा अल्ला होय या सृष्टींतील कोणी प्राणी गुन्हेगार अल्लाचे ध्यानास आला आणि त्यास हद्दपार करण्याची शिक्षा यो-

ग्य दिसून आली असतां अल्लाच्यानें त्यास ती शिक्षा देण्याचें काम कधीं ही व्हावयाचें नाहीं कारण संपूर्ण सृष्टीचें राज्य अल्लाचें त्याचे राज्यांत दुसरी हद्द मुळींच नाहीं आतां खावंदांचे राज्यांत हद्दपार करण्याचा गुन्हेगार असेल तर त्यास एक वक्ताहून सात वक्त हद्दपार करण्याचें काम खावंद करतील यांत दोन्हीं रूचविली म्हटले आहे :– "कोटस्य कीटायते" अल्लाच्या पुढें तुझा आणि तुझे राज्याचा पदार्थ किती या प्रमाणें बादशहानें ऐकून मनांत चुरमुरत उगाच राहिला.

## गोष्ट ८ वी.

## लोकांचे मनांत काय आहे.

एके दिवशीं बादशहा कचेरींत बसला असून त्या दिवशीं मोठे मोठे सरदार व उमराव तसेच संभावित आणि सभाजन आदी करून भरपूर कचेरी भरली असतां सर्व लोकांतून मोठ मोठे लोकांकडे अवलोकन करून सव्वाल करिता झाला कीं, कचेरीमे लोक बैठे है उसके दिलमो क्या है सो कहना. त्यासमयीं कोण्या-एकाची हिमत जबाब देण्याविषयीं चालली नाहीं.

आप आपणांत म्हणतात एकाचे ही मनांतील समज-
ण्यास मुष्कल तेथें कचेरींतील सर्व लोकांचे मनांत का-
य आहे तें कसें सांगतां येईल. बादशहा तरी अज्ञान
पणानें हें काय विचारितो बरें? आतां बिरबल अक्कल
वान म्हणवितो तो तरी यास वालाचा जबाब काय दे-
तो तें पाहूं असा विचार करून सर्व उगाच स्तब्ध अस-
ते झाले. बादशहानें सर्वांकडे पाहिलें तों अवघ्यांनीं मा-
ना खालीं घातल्या तेव्हां शेवटीं बिरबलास तसाच स-
वाल केला त्यासमयीं बिरबल म्हणाला कचेरींतील
सर्व लोकांचे मनांतील निरनिराळें पृथक सांगूं किंवा
एकाच जबाबानें सांगूं बादशहा म्हणाला एक जबाब
सें कह्. बिरबल म्हणाला सर्वांचे मनांत असें आहे-
कीं, खावंदांची गादी सलामत असो आणि कोणीं तशी-
च दौलत वृद्धिमत पावो असें खरें आहे किंवा नाहीं हें
सर्वांस विचारून पहावें या प्रकारें जबाब ऐकून बाद-
शहाचें मन संतोषित होतें झालें बादशहाचें कल्याण
नसावें असें जरी मनांत यद्यपि कोणाचे असेल तथा
पि बादशहा समोर तसें बोलवेल काय? तर कल्याण

असावें असेंच कबूल करणें प्राप्त यामुळें सर्व लोक कुं-
ठित होऊन बिरबल म्हणतो हें सत्य आहे असें बोलते झाले.

## गोष्ट ९ वी.

### पितरांचे समाचारास बिरबलास पाठविलें.

बादशहाचे दिवाणगिरीचें काम बिरबल चालवूं लागला यामुळें कित्येक लोकांचे मनांत वैषम्य वाटून बिरबलास जिवानिशीं ठकवावें अथवा कामावरून तरी काढावें अशा प्रयत्नांत बहूत लोक होते त्यांत बादशहाचा न्हावी जो बगणाजी नामक अत्यंत प्रीतींतील असोन महान् कपटी धूर्त होता त्यानें मसलत चालविली. एके दिवशीं बादशहाचा चेहेरा बनवीत असतां मर्जी सुप्रसन्न पाहून युक्तीनें बोलणें लाविलें कीं, महाराज, आपले वडील स्वर्गास गेल्यास बहूत वर्षे जहालीं आपण ऐश्वर्यवान् आणि महाप्रतापि असून धुरंधर मोठें राज्य चालविलें आहे वडिलांपेक्षां कीर्ती आणि दौलत मोठी मिळविली असें असतां आजपर्यंत वडिलांचा समाचार कधींच घेतला नाहीं हें बरोबर नाहीं असें त्याचें बोलणें ऐकून बादशहा म्हणाला वडि

त्यांचे समाचारास कोण पाठवावा आणि तो स्वर्गास कोणते तजविजीनें जाईल याचा विचार कसा तेव्हां व्हावी म्हणाला स्वर्गास पाठविण्याची युक्ती थोडक्यांत आहे सांगण्या विषयीं हुकूम होईल तर बोलेन बादशहा म्हणाला तुला माहीत असेल तर सांग बगणाजी म्हणाला शहरा बाहेर श्मशानाचे ठिकाणीं जो मनुष्य पाठवावयाचा असेल त्यास बसवून त्याचे सभोंवता सरणाचा ढीग रचावा आणि बत्ती लावून द्यावी म्हणजे धुरा बरोबर तो मनुष्य स्वर्गास जाईल बादशहा म्हणाला त्वां सांगितली युक्ती ठीक आहे परंतु मनुष्य कोण पाठवावा म्हणाला खावंदांचे पदरीं लक्षावधी मनुष्यें आहेत ज्यास हुकूम होईल तो जाईल त्याविषयीं अडचण नाहीं परंतु एकादा गैरी सैरी आडाणी पाठवून उपयोग नाहीं. चांगला, सज्ञान, हुषार, चतुर आणि माहितगार असा पाठविला पाहिजे सांप्रत आपले पदरीं असा सर्वगुण संपन्न बिरबला शिवाय दुसरा कोणी नाहीं खावंदानीं विचार करून पहावा. हें कार्य बिरबला व्यतिरिक्त अन्याचे हातून होण्याचें नव्हे आपली यो-

ग्य ना मोठीं याजकरितां सूज्ञ मनुष्यासच पाठविणें प्राप्त आहे एक महिन्यांत जाऊन परत येईल असें ऐकून बादशहा म्हणाला बिरबलास पाठवावा तर त्याचे कामाचा बोभाट पडेल त्यास काय करावें बगणाजी म्हणाला महाराज खावंदाची सलामत मोठी आहे कोणाचे ही हातून महिनाभर काम खावंद चालवून घेतील माझे सारख्यांस सांगितलें तरी खावंदांचे चरण कृपेनें कांहीं मात्र अडचण पडणार नाहीं. परंतु आपण विचार ठरविला हा रहित झाला असतां पितृ ऋण माथां बसेल बिरबल अनेक कारणें लावून व्यन्तर आणील आणि आपले मनोदयाचा भंग होऊन स्वर्गीं वडील आपल्यास दूषण ठेवितील कीं, आपला पुत्र अनृत वचनीं आहे यास्तव योजिलेलें काम त्वरित झालेंच पाहिजे असें ऐकून बादशहा म्हणाला खरें आहे ठरलें यांत अंतर करणें नाहीं याप्रमाणें न्हावी यानें मसलत करून घरीं निघून गेला. नंतर सायंकाळीं कचेरीस बादशहा आल्यावर बिरबल यास हुकूम करिता झाला कीं, स्वर्गीस जाऊन आमचे वडिलांना समाचार घेऊन यावें बिरबल म्ह-

पाला स्वर्गास जाण्यास मार्ग नसल्यामुळें अडच-
ण येऱ्हवीं मी जाण्यास सिद्ध आहें बादशहा म्हणाला
रस्त्याची तजवीज बगणाजी ऱ्हावी यानें सांगितली ती
बरोबर आहे गवताचा ढीग करून त्यांत तुजला बस-
वावें आणि बत्ती द्यावी म्हणजे धुराबरोबर स्वर्गास पोच
ण्यास हरकत नाहीं याप्रकारें बिरबलानें ऐकून मनांत
म्हणाला कीं, हा खेळ ऱ्हावी यानें करून माझा प्राण घे-
ण्याची तजवीज केली आहे, बादशहा तर मूर्खच आहे
परंतु आतां आपला प्राण वांचण्याची युक्ती काढून ऱ्हा-
वी यानें पारिपत्य झालें पाहिजे असें मनांत आणून
बादशहास म्हणाला खावंदाचा हुकूम झाला तो मान्य
आहे परंतु स्वर्गास गेल्यावर तेथून परत येण्यास आ-
पले वडिलांचा हुकूम होई पर्यंत तेथें रहावें लागेल.
याजकरितां कुटुंबाचे निर्वाहाची तजवीज सहा महि
न्याची तरी करून ठेविली पाहिजे याजकरितां एक ल-
क्ष रुपये खर्चास दिले पाहिजेत आज पासून एक म-
हिन्यांत घरची तजवीज नीट लावून जाण्याची तयारी
करितों याप्रमाणें त्याचें बोलणें ऐकून बादशहानें एक

लक्ष रुपये तात्काळ देऊन जाण्यास एक महिन्याची मुदत दिली नंतर बिरबल आपले घरीं येऊन एक महिन्यांत अशी तजवीज करिता झाला कीं, घरांत एके बाजूस एक निर्बंध खोली होती त्या खोलींतून श्मशाना पर्यंत मजबूद असें भुयार आपले विश्वासू मनुष्याचे हातून खणून श्मशानांत ज्या ठिकाणीं बसावयाचें तेथें भुयाराचे तोंडीं एक लहान पातळ अशी चीप बसवून ठेविली. याप्रमाणें बाहेर कोणासही न कळतां तजवीज करून ठेवून मुदत भरतांच बादशहा कडे जाऊन बोलता झाला कीं, स्वर्गास जाण्या करितां मी घराहून निघोन आलों आतां माझी रवानगी सत्वर करावी तेव्हां बादशहानें बगणाजी न्हावी यास बोलावून आणून तयारी करण्यास सांगितलें बिरबल म्हणाला खुदावंत आपण मोठे श्रीमान् आपल्या कडून मी समाचारास जाणार तेव्हां आपले लौकिका प्रमाणें आपले वडिलांस कांहीं तरी अपूर्व भेट नेली पाहिजे तेव्हां बादशाहानें उत्तम प्रकारचीं रत्नें आदिकरून दहा पांच लक्षांचें जवाहीर व वस्त्रालंकार मिळोन मूर्खपणानें भेटी करितां बिरबलाचे

स्वाधीन केलें तें बिरबलानें पदरांत घेऊन तेथून - निघून स्मशान भूमिकेस आला आणि भुयाराचे तोंडीं चीप बसविली होती त्याजवर येऊन बसला नंतर बगणाजी न्हावी यानें एकलक्ष गवताचा ढीग त्याचे सभोंवती रचून बत्ती लावून दिली. तेव्हा ज्ञाने जन विस्मय पावोन म्हणतात काय हो हा बादशहा शतमूर्ख आहे बिरबला सारिखा मोहोरा न्हाव्याचे बुद्धीस लागून व्यर्थ दवडिला इत्यादि दूषणें ठेवून अपार खेद करिते झाले. इकडे गवत रचूं लागल्या बरोबर पायाखालची चीप काढून भुयारांत शिरोन पुनःदार बंद करून टाकिलें त्या विवर मार्गानें आपले घरीं गुप्त खोलींत येऊन एकांत स्थानीं कोणास ही न कळतां राहता झाला. तेथें पूर्वीच सर्व सोई करून ठेविल्या होत्या सहा महिने अडचण न पडावी असें करून ठेविलें होतें आणि जिवाचा विश्वासू सेवक होता त्यास सहामहिने भरतील त्या दिवशीं खोलीचें द्वार मुक्त करीन म्हणून सांगितलें होतें. इकडे बगणाजी न्हावी यास मोठा आनंद होऊन शर्करा वांटिता झाला. कृतकार्य होऊन आपले मना-

त म्हणाला कीं, एवढा शहाणा बिरबल म्हणतात परं-
तु त्याचा नाश मी बहादराने केला कीं नाहीं असा मोठा
अंतःकरणांत आल्हाद पावून बिरबलाचा सर्व अ-
धिकार चालविता झाला. बिरबलाचे आप्त इष्टमित्र हु-
द्यावर होते ते दूर करून आपले तर्फेचे कामगार त्या त्या
ठिकाणीं नेमिले आणि सर्व लोकांस अत्यंत पीडा देता
झाला. या प्रमाणें सहा महिने लोटे तोंपर्यंत बिरबल
गुप्त खोलींतच बसता झाला. खाणें पिणें आदी करून
सर्व तजवीज त्याच ठिकाणीं होत होती. सहा महिने-
झाल्या नंतर गुप्तपणेंच बादशहा कचेरीस बसला-
आहे अशी बातमी आणवून निळीं पिंवळीं अशीं नव्हे
बाज उंचीं वस्त्रें प्रावर्णे आणून ठेविलीं होतीं त्याचा पो-
षाक करून सहा महिने श्मश्रु करविली नवती त्यामु-
ळें हात हात केंश डोकीचे लांब वाढले तसेच दाढी मि-
शांचे केंश वाढलेले आणि नखें वाढलेलीं तशींच का-
इम असून खोलींतून निघून एकाएकीं कचेरीस जा-
ऊन बादशहास ख़ुरनिसात करून हात बांधून समो-
र उभा राहिला. त्यास बादशहानें अवलोकन करून.

ला त्यां मोठीच ही कामगिरी करून स्वर्गलोकाहून स्व-स्वरूप आलास फार चांगलें झालें आतां कारागीर को-णता कशा तजविजीनें पाठवावा हें सांग म्हणजे ता-त्काळ आतांच तजवीज करितां येईल. बिरबल म्ह णाला आपला खाजगी कारागीर बगणाजी न्हा-वी यास पाठवावा जसा मला गवताचे धुरावर पाठ-विला तसाच पाठवावा. धुराचे योगानें फार आया-स न पडतां स्वर्गास जाण्यास अगदीं विलंब लागत नाहीं या प्रमाणें बादशहानें ऐकून तात्काळ बगणा जीस बलावून आणून सांगितलें कीं, आमचे वडिलां नीं हजाम पाठविण्या विषयीं निरोप धाडिला आहे त्या-स त्यांजकडे तुजला आतांच गेलें पाहिजे असें सांगून त्याची रवानगी करून देण्या विषयीं बिरबलास हुकू-म केला. तेव्हां बिरबलानें तत्क्षणींच त्या बगणाजी-स श्मशानांत नेऊन गवताचा ढीग त्याचे सभोंवता र-चून बत्ती लावून दिली. आणि त्यास भाजून रक्षा क-रून टाकिली. या प्रकारें चातुर्याचे युक्तीनें बिरबला-नें आपला प्राण वांचवून दुष्ट दुर्जन वैऱ्याचा नाश केला.

## गोष्ट १० वी.

## बिरबल कन्येचें भाषण.

एके दिवशीं बादशहाचे कचेरीस जाण्या करितां बिरबल घराहून निघाला ते समयीं त्याची कन्या चार-वर्षांची लाडकी होती ती मोठ्यानें बिरबला समागमें कचे-रीस येण्याचा आग्रह करिती झाली त्यास्तव त्या दिव-शीं बिरबलानें तिला समागमें कचेरीस आणिलीं नं-तर कचेरी बरखास्त होण्याचे समयीं बादशहानें बिर-बलास विचारिलें कीं, ये छोकरी किसकी है बिरबल म्हणाला खुदावंद ये हमारी है तेव्हां बादशहानें आप-ले जवळ बसावून प्रीतीनें स्नेहयुक्त मिठाई दिली आ-णि कांहीं तिच्या वहिवाटींतील अशीं थट्टा युक्त गोड मधुर भाषणें तिजशीं करिताझाला. तेव्हां ती कन्या ली-न तेनें विनय पूर्वक त्या संभाषणाचे जबाब मोठे चतुर मनुष्या सारखे करिती झाली. तेव्हां बादशहाची मर्जी खुष होऊन मिरधेस हुकूम करिता झाला कीं, उस् छो करीको एक अच्छा नन्हेका बट देनेकू ले आव. असा हु कूम होतांच मिरधेने पागेंतून एक सुंदर धष्टपुष्ट लहा-

नसर बिनखोड गरीब असा धाकटा घोडा आणून पुढें उभा केला. त्यासमयीं घोड्याचा साहजीक स्वभावानुसार त्याणे शिश्न बाहेर काढून फुरफुरला तेव्हां बादशहा म्हणाला बिरबल के सोकरी उपर घोडा खुष है. या प्रमाणें कांहींसें खोंचून बोलला तें ऐकून कन्या म्हणाली ऐसा नहीं जी त्याचें म्हणणें असें कीं बादशहा आजपर्यंत माझे पाठीवर बसला आतां माझे कढूवर बसेल असें त्याचें म्हणणें आहे या प्रकारें मुलीचें धैर्य आणि चातुर्य कचेरीचे लोक आणि बादशहा यानीं पाहून अत्यंत विस्मय पावते झाले नंतर कचेरी बरखास्त होऊन त्या घोड्यावर कन्येस बसवून बिरबल घरीं घेऊन येता झाला.

## गोष्ट ११ वी.

## हमको बम्मन करदे.

एके समयीं बादशाहा गंगेच्या नदाकानें जात असतां प्रत्येक घांटवरून ब्राह्मणांचा समुदाय स्नान संध्या दी करीत आहेत आणि यवनादिक आनंदें करून मच्छाचे प्राण हरण करीत आहेत अशीं उभ-

यवनांची कर्मे पाहून बादशहाचे मनास खेद होता झा-
ला कीं, आपली जाती अमंगळ अनाचारी होय. ब्राह्म
णाची जाती शुचिर्भूत आणि सदाचार संपन्न ही उत्तम
होय. असें मनांत घेऊन बिरबलास समीप बोलावून
म्हणाला कीं, जैसे तुम बम्मन है वैसा हमकू बम्मन-
कर देव तेव्हां बिरबल म्हणाला महाराज, असें हो-
ण्यास दोन तीन लक्ष रुपये लागतील ते खावंद देती
लतर तजवीज पहातों त्यास मर्यी बादशहानें कबूल
करून तिन लक्ष रुपये तात्काळ बिरबलाचे पदरी-
घातले आणि आठ दिवसांची मुदत केली. त्यानंतर
बिरबलानें घरीं येऊन शहरांतील सर्व ब्राह्मण बला-
वून आणून त्यांस ते तीन लक्ष रुपये वांटून दिले. उपां-
त आठ दिवस जाऊन नववे दिवशीं बादशहा कडील
बोलावणें आलें त्याचें कारण समजून बिरबलानें पां-
च चार खगरे आणि एक गर्दभ असें घेऊन नदीवर
गेला आणि त्या गर्दभाचे अंगावर पाणी शिंपून ख-
राऱ्यानें त्याचें अंग घांशित बसला. तों बादशहानें
दुसरें बोलावणें पाठविलें त्याजबरोबर निरोप सां-

गून पाठविला कीं, गद्धे को तेजी बनाकर फेर आना हे असा निरोप पाठविला त्याजवर आणखी पांच स हा बोलावणी पाठविलीं तीं ही माघारीं फिरविलीं ते. व्हां बादशहा जातीनें सडी स्वारी निशीं तेथें आला आ. णि पहातो तों खराऱ्यानें गाढवाचे आंगाची सालडी का. ढून सर्वांग लाल करून वारंवार रक्त धुवून काढीत आ. हे असें पाहून बादशहा म्हणाला अबे बिरबल ये तूं क्या करते हो बिरबल म्हणाला खावंद देखो गध्धे कूं तेजी देकर उस्का घोडा बनाता है बादशहा म्हणाला गद्धेका घोडा कैसा बनेगा बिरबल म्हणाला खुदावं. त गद्धेका घोडा नहि बनेगा तो फेर मुसलमीनका ब. म्मन कैसा होयगा असें ऐकून बादशहा म्हणाला ब. म्मन करनें कों गधडे माफक हमारा आंग करनें लगेगा क्या बिरबल म्हणाला हां तो वैसा करने बिगर बम्म. न कैसा बनेगा याप्रमाणें ऐकून बादशहा म्हणाला बिरबल सुनो हम् बम्मन ने होता जो मुसलमीन है सो. ई अच्छा है बिरबल म्हणाला खावंदांनीं तीन लक्ष रु. पये याकामास खर्चास दिले ते ब्राह्मणास धर्म कर-

यास खर्च झाले आतां आपल्यास फार अवकाश रा- हिला नाहीं असें असून खावंद आतां ब्राह्मण होत ना- हींत तर रुपये खर्च झाले ते व्यर्थ जाणार याजकरितां ब्राह्मण व्हावें म्हणजे खर्च केल्याचा उपयोग होईल. बादशहा म्हणाला रुपये गयातो कुच फिकीर नहिं पर- हमसें बम्मन होनेकी बात मत करो असें बोलून बाद- शहा तेथून निघून कचेरीस जाता झाला. बादशहा दि- लेले रुपये परत मागेल सबब बिरबलानें सर्व बोली सोडवून घेऊन संकट निवारण करिता झाला.

## गोष्ट १२ वी.

## चितान्याचें कपट.

एका समयीं बादशहानें आपले रंग महालांत चित्रें काढण्या विषयीं महंमद नामक चितारी फार कुशल हो- ता त्यास हुकूम केला त्यानें एक महिन्यांत अतिशय मे- हनत करून सर्वोत्कृष्ट चित्रें काढून चांगले उत्तम उंची रंग देऊन मनो रमणीय सुंदर चित्रें काढिलीं त्यांत ए- क चित्र असें काढिलें कीं, ज्या पासून हिंदूची नाचकी असून यवनाची प्रशंसा केली होती ती अशी एक प-

कीर अंजुली पुटजोडून ध्यान लावून निमाज पढत आहे त्याचे शेजारीं एक हिंदु उभा राहून एका हाताने लिंग धरून दुसरे हाताने मिठाई खात आहे आणि- पुढें चालत असून मागें पहात आहे असें वेडेंविद्रें- चित्र हिंदूची उपहास्यता करण्या साठीं काढिलें होतें नंतर सर्व चित्रें तयार झाल्यावर महंमद चितारी बाद- शहास विनंती करिता झाला कीं, रंगमहालांत चित्रें काढून तयार केलीं आहेत खावंदांनीं अवलोकनांत- आणावीं या प्रमाणें त्याचें बोलणें ऐकून बादशहा मं- डळी सह बिरबलास समागमें घेऊन रंगमहालांत ये- ता झाला तेव्हां प्रत्येक चित्राचें नांव घेऊन बिरबल बादशहास चित्रें दाखवीत चालला असतां फकिरा चे चित्रा जवळ आला त्यांतील भावार्थ पाहिला तों- हिंदूची नाचक्की काढिली आहे तेव्हां मनांत आणिलें कीं, हा चितारी कपटी आणि निंदक आहे यास्तव यास शिक्षा होईल अशी तजवीज केली पाहिजे असा वि- चार करून त्या चित्रा जवळ येऊन बादशहास म्ह- णाला महाराज हें पहा चितारी यानें आपले ज्ञाती-

स फारच हीनत्व येण्यानें चित्र काढिलें आहे. हा हिं-
दु मनुष्य शिराई खान असतां हा फकीर दोन्ही हातप-
सरून त्याजपाशीं आर्जव युक्त शिराई मागत आहे.
परंतु या हिंदूचे मनांत त्यास कांहीं देऊं नये म्हणून-
उठून चालला तथापि फकीर हात पसरून मागतच
आहे तेव्हां हिंदूस राग येऊन फकीर यास छडी घे म्ह-
णून प्रत्यक्ष हातीं धरून त्यास दाखवीत आहे आ-
णि मागें पाहून पुढें जात आहे. अशा त्या चित्राचा उल-
ट भाव बादशहास करून दाखविला तेसमयीं बाद
शहास क्रोध येऊन त्या चितारा याचे पायांत बेडी-
ठोकून एकवर्ष कैदेंत टाकिला. याप्रकारें जसा मंत्री
असेल तदनुसार राजाची वर्तणूक चालते.

## गोष्ट १३ वी.

## चार जिनसांची.

बिरबलाचें महत्व वाढत चालल्या मुळें तें त्याय-
वन लोकांस दुःसह होऊन त्याज कडील हुद्दा काढ-
ण्याची मसलत त्यानीं चालविली बादशहाचा मेहुणा
शेख अल्ली या नांवाचा होता त्यास दिवाणगिरी मि-

जावी म्हणून बादशहास अर्ज करण्या विषयीं रा-
णी जवळ मोठ मोठे यवनलोक यांनी रदबदली केली.
त्याजवरून तिचे ही मनांत वागलें कीं, आपले बं-
धूस मोठा हुद्दा मिळावा नंतर एकांनीं मंदिरांत बा-
दशहाची मर्जी सुप्रसन्न पाहून त्यासमयीं अर्जक-
रिती झाली खावंद आपलें यवनी ज्ञातीचें राज्य अ-
सून हिंदु दिवाण असल्या मुळें आपले ज्ञातीस कां-
हीं सुख होत नाहीं हें अगदीं गैरशिस्त आहे याज-
करितां बिरबल याजकडील दिवाणगिरी काढून
माझा भाऊ शेख अल्ली यास त्याचे कामावर योजा-
वा म्हणजे आपले ज्ञातीची स्थिती आणि स्वस्थता
चांगले प्रकारे राहील असें तिचें बोलणें ऐकून बा-
दशहा म्हणाला तुझा बंधू अज्ञानी केवळ मूर्ख अ-
सल्या मुळें राज्याचें रक्षण करण्या विषयीं त्याची
अक्कल नसीच वकुबीही नाहीं बिरबलाचे सहस्त्रां-
शाने ही आपले स्वकीय मंडळींत अक्कलवान कोणी
एक ही नाहीं राजकीय काम अक्कलवंता वांचून क-
से चालेल कोणते वेळेस काय प्रसंग येतो याचा नि

थम नाहीं. यास्तव तुझें बोलणें कांहीं उपयोगी नाहीं - असें उभयतांचें संभाषण होतें झालें. त्याजवर कांहिं दिवस गेल्यानंतर आठ पंधरा दिवशीं बोलणें लाविलें तें असें कीं, बिरबलास दूर करणें विषयीं राणीनें त्रास आणिला तेव्हां बादशहा मनांत म्हणाला कीं, कांहीं एकवेळ आपले लोकांची तरी खात्री झाली पाहिजे बिरबला वांचून परिणाम नाहीं हें सिद्धच आहे पण राणीचे मर्जीस्तव बिरबलास चार दिवस घरीं बसवावें असा विचार योजून एके दिवशीं बिरबलास एकांतीं सर्व मजकूर कळवून सांगितलें कीं, राणीचे मर्जी खातर तूर्त तूं कांहीं दिवस घरीं बसावें थोडकेच दिवसांत पूर्ववत होण्यास हरकत नाहीं असें सांगून त्यास घरीं बसविलें आणि दिवाणगिरीचें काम आपला जो मेहुणा शेख अल्ली यास सांगितलें तदनंतर चार महिन्यांतच कांट्यावधीनें नुकसान होऊन चुकलें चहूंकडे सर्व कारखान्यांतून बजबज झाली. बादशहा पर्यंत बोभाट येऊं लागले त्यासमयीं शेख अल्लीची अक्कल पहाण्यास आणि त्यास त्रास होण्या

करितां एक युक्ती काढून त्यास बोलावून आणून-
सांगितलें कीं, चार जिनसांची फार जरूर आहे ते ल-
वकर मिळवून आणिले पाहिजेत ते असे कीं, सबूरस,
सबूजीन, निमक हलाल. निमक हराम येणें प्रमाणें चा-
र जिनसा एक महिन्यांत मिळवून आणून द्याव्या न-
दिल्यास शिरच्छेद केला जाईल. या प्रमाणें हुकूम ऐ-
कून शेख अल्लीनें देण्याचें कबूल केलें. नंतर देशो दे-
शीं आणि गांवोगांवीं त्याजिनसां साठीं चांगली हुषा-
र अशीं मनुष्यें रवाना केलीं. आणि स्वतः मोठे मोठे-
शहरांत जाऊन जिनसांचा शोध करिता झाला परंतु ए-
काही जिनसांचा तपास लागेना. महिन्याची मुदत भ-
रत आली, देशो देशीं पाठविलेलीं मनुष्यें तींही रिका
मींच आलीं. कोठें ही जिनसांचा शोध लागेना मुदती-
स एक दिवसाचा अवकाश राहिला तेव्हां शेख अल्ली
अत्यंत भयाभीत आणि चिंताग्रस्त होत्साता अन्न पा-
णी सोडिता झाला. तों एक महिना पूर्ण झाला. रात्र गे-
ली म्हणजे प्रातःकाळीं प्राणांत व्हावयाचा म्हणून रड-
त बसला तेव्हां राणीनें सांगून पाठविलें कीं, बिरब-

लास शरण जावें म्हणजे तो कांहीं तजवीज काढील तर पहावी असें ऐकून तात्काळ बिरबलाचे घरीं जाऊन त्याचे पाय धरिले. आणि सर्व हकीकत त्यास सांगून बोलला कीं, कसेंहि करून जिनसा मिळवून द्याव्या. नाहींतर प्राणांत समय आहे असें ऐकून बिरबलानें शरण आला असें जाणून त्यास अभ्यासन देऊन सांगितलें कीं, भिऊं नको तुझे प्राणास किंवा केशास धक्का लागूं देत नाहीं एक लक्ष रुपये आणून दे म्हणजे जिनसा मिळवून देतों असें ऐकतांच शेख अल्लीनें एक लक्ष रुपये तात्काळ आणून दिले ते बिरबलानें घेऊन दोन डब्यांत दोन जिनसा भरून दिल्या आणि सांगितलें कीं, सबूरसाची एक डबी आणि दुसरी सबजीव याची डबी आहे. या दोन जिनसा बादशहास नेऊन द्याव्या बाकी दोन राहिल्या त्या देण्यासारिख्या नाहींत सबब बादशहास सांगावें कीं, आणीक दोन जिनसा बिरबलाजवळ दिल्या आहेत त्यास बोलावून आणावें म्हणजे तो देईल. असें सांगून शेख अल्लीस लावून दिला. नंतर दुसरे दिवशीं कचेरी

भरतांच बादशहानें शेख अल्लीस बोलावणें पाठविलें तेव्हां त्यानें दोन डब्या समागमें घेऊन कचेरीस आला आणि बादशहा पुढें डब्या ठेवून एकींत सबरस व दुसरींत सबजीव आहेत असें सांगितलें त्यासमयीं बादशहानें उघडून पाहिल्या तों एकींत सबरस तो मिठाचा खडा व दुसरींत सबजीव तें उदक याप्रमाणें जिनसा खऱ्या आहेत असें पाहून बादशहा शेख अल्लीस म्हणाला या जिनसा अकलेच्या खऱ्या आहेत परंतु तुझ्या अकलेनें खचीतच मिळाल्या नसाव्या आणि बिरबला शिवाय ही दुसरे कोणाच्या अकलेनें निर्माण झाल्या नसाव्या असें खचीत होय आतां आणीक जिनसा कोठें आहेत त्या द्याव्या तेव्हां शेख अल्ली म्हणाला बिरबलाजवळ ठेविल्या आहेत त्यास कचेरीस बोलावून आणावें म्हणजे तो देईल याप्रमाणें दिवाणाचें बोलणें ऐकून बिरबलास पाचारण पाठविलें तेव्हां बिरबल घराहून निघून कचेरीस येत असतां वाटेनें एक कुत्रें पाहिलें त्याचे गळ्यास आंगरख्याची कादणी लावून समागमें घे-

ऊन कचेरीस आला येतांच बादशाहानें दोन जिनसा दिवाणानें दिलेल्या मागितल्या तेव्हां बिरबलानें कुत्रें पुढें केलें आणि सांगितलें कीं, तिसरी जिन्नस हें श्वान घ्यावें आणि चौथी जिन्नस तर आपले समीप जांवई बसले आहेत ती निमकहराम चौथी जिन्नस घ्यावी. येणे प्रमाणें चारी जिनसा पाठविल्या त्या समर्थी बादशहा म्हणाला बिरबल ये चार जिनसाका समजब-ताव तेव्हां बिरबल सांगतो:_सबूरस तें मीठ आहे. मिठा वांचून कोणताही पदार्थ सुरस होत नाहीं सर्व-पदार्थांस रुची देणारें मीठ होय. सबजीव म्हणजे-उदक या उदकानें सर्व जीव बचावले जातात. सकल जीवांचें जीवन उदक होय. तिसरा जिन्नस निमकह-लाल हें कुत्रें यास भाकरीचा तुकडा जरी घातला त-री पुरतो आणि चाकरी हलाल करितें. आतां चौथी-जिन्नस निमकहराम जांवई त्यास कन्याही द्यावी आ-णि हरएक सणावारास सुग्रास भोजन आणि वस्त्रें प्रावर्णें द्यावीं तसेंच हमेशा न्यून पडेल तेथें द्रव्यादिकें पूर्तता करावी तथापि त्याचें मनाचा संतोष न होता अ-

शुरानें कांहीं दिलें नाहीं म्हणून निंदा न करितात कि-
तीही त्याजवर उपकार केले तरी ते तो जाणत नाहीं.
याविषयीं म्हटलें आहे.

जामाता कृष्णसर्पश्च पावको दुर्जनस्तथा
उपकारो न जानाति पंचमो भगिनीसुतः

जामात आणि कृष्णसर्प तसाच अग्नि आणि दु-
र्जन, पांचवा भगिनीचा पुत्र म्हणजे भाचा हे पांच उप-
कार जाणत नाहींत या प्रमाणें बादशहानें ऐकून संतो-
ष पावला नंतर शेख अल्ली कडील दिवाणगिरीचें का-
म काढून बिरबलास दिलें.

जामात तितके निमक हराम असें बादशाहानें
ऐकिलें होतें त्याजवरून बिरबलास हुकूम केला कीं,
जितके जांवई आपले शहरांत आहेत तितके संपूर्ण सु-
ळावर द्यावे. त्याप्रकारें हुकूम ऐकून बिरबल म्हणाला
खावंद सूळ तयार करण्यास खर्च फार लागेल तेव्हां
बादशाहा म्हणाला जो लागेल तो खर्च करून एका-
च समयीं एकदम सर्व जांवई सुळीं चढवावे असा हु-
कूम झाला. नंतर बिरबलानें पांच च्यार हजार सूळ

तयार केले. त्यासमयीं बादशहाचे जांवई तसेच व-
जीर उमराव आणि सरदार व सावकार लोक यांचे जां-
वई बिरबलास शरण येऊन बोलते झाले कीं, हरए-
क तजविजीनें आमचे प्राण वांचविण्याची युक्ती तु-
मच्या शिवाय कोणा एकाचे ही हातून होणें नाहीं या-
स्तव आमचे जिवामाफक द्रव्य मागाल तरीं देऊं तेव्हां
बिरबलानें कोणा पासून दोनशें पांचशें या प्रमाणें-
रुपये घेतले ते दहा पांच लक्ष रुपये जमा झाले. नंत-
र बिरबलानें शूळ तयार केलेच होते त्यांत लांकडी-
शूळा शिवाय कांहीं लोखंडाचे व तांब्याचे आणि पि-
तळेचे असे दोन तीनशें तयार केले आणि त्या खेरी-
ज एक सोन्याचा व एक रुप्याचा असेही तयार करून
ते एकंदर सूळ उभे केलेले बादशहास दाखविण्या-
करितां तेथें आणिले त्यासमयीं बादशहानें तें सर्व
पाहून बिरबलास म्हणाला हे लांकडा शिवाय पंच-
धातूंचे शूळ कशास्तव केले आहेत बिरबल म्हणा-
ला खावंद हे लांकडी शूळ गरीब लोकांस व त्याहून
प्रतिष्ठीत मध्यम लोकांस लोखंडाचे आणि सरदार

व उमराव तसेंच सावकारलोक यांचे जांवयांस तांब्या-
चे आणि पितळेचे असे योग्यतेनुरूप केलें आहेत ते-
व्हां बादशहा म्हणाला एक सोन्याचा आणि एक रुप्या-
चा हे कशासाठीं बिरबल म्हणाला महाराज रुप्याचा
तो मजसाठीं आणि सोन्याचा खावंदांसाठीं केला आ-
हे बादशहा म्हणाला ये क्या तुम कहते हम्‌कों और
तुमकों काहेकों वास्ते बिरबल म्हणाला खावंदांचा हु-
कुमच तसा झाला कीं-शहरांत जितके जांवई असती-
ल तितके सर्व सुळीं द्यावे तेथें मग मी काय करावें ज-
सा हुकूम झाला तशी तयारी केली आहे. पहा मी ही
आपले सासऱ्याचा जांवई आहें तसेच खावंद ही आप-
ले सासऱ्याचे जांवई आहेत या करितां हुकुमा प्रमाणें
सर्वांस सूळ बनविले आहेत पहिल्यानें खावंदांस मा-
न देऊन त्यानंतर मजला माझे मागून सर्व लोकांस-
माना प्रमाणें अनुक्रमानें शूळावर चढवावयाचे याप्र-
माणें बिरबलाचें भाषण ऐकून बादशहा मनांत म्ह-
णाला हें लचांड आपले भोंवती ही वास्तवीक रीतीनें
आलें असें जाणून बिरबलास म्हणाला अबे बिरब-

ख आब ये काम सब रहने दे जोरवरच हुवा सो जाने देव असें बोलून घरीं येता झाला. या प्रमाणें चातुर्यतेनें बिरबलानें दुसऱ्यांचे प्राण वांचवून लक्षावधी रुपये मिळविले.

## गोष्ट १५ वी.

## लाटा मोजणे विषयीं.

बादशहानें आपला जो शालक शेख अली त्यास दिवाणगिरीचे कामावरून दूर करून पुन: बिरबल यास दिवाणगिरी दिली त्यामुळें बादशहाचे राणीस खेद आणि क्रोध उत्पन्न झाला तदनंतर कित्येक दिवसांनीं एकांत समयीं बादशहाची मर्जी सुप्रसन्न पाहून राणी अर्ज करिती झाली कीं, माझा बंधू शेखअली याजकडील दिवाणगिरी काढून बिरबलास दिली तेणें करून यवन ज्ञातीस हीनपणा येऊन हिंदू ज्ञातीचा उत्कर्ष होत आहे याजकरितां पुन: त्यास दिवाणगिरीचें काम दिलें पाहिजे असें ऐकून बादशहा म्हणाला त्याचे आंगीं अक्कल नाहीं त्यास मी काय करूं बुद्धिमंत आणि युक्तिवंत यांज वांचून

राज्य कारभार चालत नाहीं. आणि द्रव्य प्राप्ती ही होत नाहीं याचा अनुभव कळण्या करितां सांप्रत तुझ्या बंधूस एक काम सांगतों त्यापासून त्यानें काहीं फायदा करून काम बजाविलें तर त्यास दिवाणगिरीचें काम मिळेल या प्रमाणें बोलून दुसरे दिवशीं शेख अल्ली यास बोलावून आणून सांगितलें कीं, सूर्योदया पासून अस्तमान पर्यंत एक दिवसांत समुद्राच्या लाटा किती होतात तें पाहून एकंदर संख्या सांगावी. याप्रमाणें हुकूम ऐकून शेख अल्ली तेथून निघाला तो दरकुच दर मुक्काम करीत समुद्र तीरीं एका बंदरावर तटाकीं बसून लाटा मोजूं लागला. तों लाटेंत लाट आणि लाटेमागें लाट वरचेवर येऊं लागल्या. एकीवर नजर ठेवितो तो दुसरी येऊन फुटोन गेली. याप्रमाणें मोठा घोंटाळा होऊन जाण्याचा सुमार कांहींच समजे नासा झाला. तथापि तसाच अजमासानें मोजीत असतां सूर्योदया पासून अस्तमाना पर्यंत उपाशीं बसून एकंदर अजमासानें लाटा अमुक झाल्या अशी बेरीज

करून तेथून निघाला तो बादशहाची स्वारी होती तेथें येऊन लाटांची संख्या अमुक झाली म्हणून सांगता झाला तें ऐकून बादशहास क्रोध येऊन उगाच राहिला. नंतर शेख अल्लीचें काम बिरबल यास बोलावून आणून सांगितलें कीं, सूर्योदया पासून अस्तमान पर्यंत समुद्राच्या लाटा एक दिवसांत किती होतात तें सांगावें. या प्रमाणें बिरबलानें ऐकून तात्काळ तेथून निघाला तो समुद्र तीरीं ज्या बंदरांत शेख अल्ली गेला होता त्याच बंदरांत येता झाला. आणि गलबतें, विरकटी आदी करून जहाजें होड्या वगैरे जाण्याचा जो पाण्यांतून रस्ता होता त्या रस्त्यांत शेंकडों हजारों चौक्या बसविल्या. आणि जीं जहाजें लहान किंवा मोठीं पाण्यातून रस्त्यानें चालली होतीं तीं सहस्त्रावधी अडवून धरिलीं आणि त्याजवरील मालक यांस सांगितलें कीं, बादशहाचा हुकूम आह्मास लाटा मोजण्याचा आहे यास्तव तुमचे जहाजानीं लाट मोडली असतां जहाज लुटून बुडवून टाकूं या प्रमाणें कडक मोठ्या अमलाचा

हुकूम ऐकून जहाजाचे मालक मोठ्या अडचणींत सांपडून विचारांत पडले. नंतर सर्वांनीं समुच्चय करून बिरबलास बोलणे झाले कीं, जहाजाचा मगदूर पाहून दरएक जहाजाची खंडणी घेऊन मार्ग मोकळा करून द्यावा. याप्रमाणें गलबतावरील लोकांनीं द्रव्य देण्याचा ठराव केला. तेव्हां तें बिरबलानें कबूल करून दहा रुपया पासून दोनशें रुपये पर्यंत होड्या पडावें गलबतें तिरखती वगैरे लहान मोठें जहाज पाहून मगदुरा प्रमाणें पैसा घेऊन अडविलेलीं जहाजें मोकळीं करून दिलीं आणि पुढें अस्तमान पर्यंत जीं जीं आलीं व गेलीं त्यांजपासून द्रव्य घेत असतां अस्तमान पर्यंत एकंदर दहा लक्ष रुपये जमा झाले ते घेऊन बादशहाचे स्वारींत येऊन बादशहाचे खाजगी तिजोरींत ते रुपये जमा करून दहा लक्ष रुपयांची पावती घेऊन कचेरीस येता झाला आणि खुरनिसान करून उभा राहिला तेव्हां बादशहा म्हणाला समिंदरका लाटा कित्ता हुवा बिरबल म्हणाला खुदावंत सुनो दहा लक्ष रुपये खावंदांचे खाजगी ति-

जोरीस जमा करून ही पावती आणिली आहे असें बोलून पावती पुढें टाकिली. ती बादशहानें पाहून-आपला शालक शेख अल्ली यास विचारिलें कीं, तुझी पावती कोठें आहे त्या समयीं तो लज्जित होऊन खालीं पहाता झाला. नंतर कचेरी बरखास्त होऊन रात्रौ बादशहा रंगमहालांत गेल्यानंतर राणीस झालेलें वर्तमान सांगितलें तेव्हां तिनें ती हकीगत ऐकून उगीच राहिली.

## गोष्ट १५.वी.

## नदी काहेको रोती है.

एके दिवशीं पर्जन्य बहुत पडल्या मुळें दिल्ली शहरा जवळील जी यमुना नदी ती दुथडी भरून वहात असतां उदकाचें खळाळीनें महाजोराचा खळखळ शब्द एकसारखा होऊन गर्जना होत असतां मध्यान्ह रात्रीचें समयीं बादशहा निद्रिस्थ होता तो जागृत होता झाला ती निवांत समय असल्या मुळें नदीचें उदकाचा एकसारखा शब्द होत आहे ती ध्वनी श्रवण करून सेवकजनास म्हणाला (क्यों वे नदी काहे को रोती है)

याप्रकारें सेवकांनीं ऐकून कोणासही त्याचा जबाब दे णयाचें ज्ञान नसल्यामुळें स्तब्ध रहाने झाले. तेव्हां आणीक सेवकांस बोलावून आणून त्यासही या प्रकारेंच विचारिता झाला. परंतु कोणाच्यानें ही त्याचा जबाब देववला नाहीं. पांच चारशें सेवक मिळाले असून बादशहाचें सव्वालाचें समाधान करण्याची अक्कल एकांनही नवती त्यासमयीं तेवढे अपरात्रीस बिरबलास बोलावून आणून विचारिलें कीं, नदी काहे को रोनी है या प्रमाणें बिरबलानें ऐकून मनांत म्हणाला बादशहा किती अज्ञानी आहे पर्जन्यामुळें उदक विशेष वाढून खळबळ खळाळीमुळें शब्द होत आहे तेथें आरडती रडती या कल्पनेस काय म्हणावें. असो तथापि चतुरपणा असून त्याची समज पडे असा जबाब दिला पाहिजे असें मनांत आणून बिरबल म्हणाला खुदावंद सुनो उसका बाप परवत उस घरसे निकल कर उसका खसम दर्या है उसको मिलने को वास्ते ससुर के घर कों ज्याती रहि उस्से वास्ते रोती है. याप्रकारें बादशहानें ऐकून खुष होता झाला. नंतर उभयतां गो-

ष्टी करीत बसले असतां बादशाहा म्हणाला बिरबल-अब बडी रात भई है उस् बखत कौन चलता है बिरबल म्हणाला खुदावंद सुनो इस बखत सावकार का ब्याज चलता है उसको सब रात निंद नहीं याप्रकारें यथायुक्त भाषण ऐकून बादशाहा संतोषित होऊन बिरबलास घरीं जाण्यास रजा देता झाला.

## गोष्ट १६ वी.

## हमारे पांव अच्छा.

एका समयीं बादशाहा आणि राणी उभयतां भूमीवर पाय ठेवून एके ठिकाणीं मंचकावर बसलीं असतां-राणी स्वपु सुरत नूतनवयस्क असल्यामुळें परमसुंदर-सुशोभित दिसत होती. बादशहाचे स्वरूपाचें तेज तिचे तेजापुढें लपून गेलें. बादशहास ती अत्यंतप्रिय असून उभयतां अत्यंत प्रीतींत येऊन गोष्टी बोलत असतां राणी म्हणाली खावंद देखो तुमारे पांवसे हमारे पांव अच्छा दिखता है. बादशहा म्हणाला तेरे पांवसे हमारे पांव अच्छा है असा उभयतांचा विनोद संवाद चालला तो मिटेना तेव्हां तेथें मोठमोठे लोक आणिसे

वक प्रांती तोल होते त्यांस राणीनें विचारिलें कीं, खुदावंत के पांव अच्छा क्या हमारे अच्छा सो कहदेव याप्रमाणें सर्व सेवकांस विचारिलें तेव्हां त्यांनीं ऐकून उगाच स्तब्ध राहिले. राणीचे पाय अच्छा म्हणावे तर बादशहास क्रोध येणार बादशहाचे चांगले म्हणावे तर राणीस राग येणार. याजकरितां कोणी कांहीच उत्तर देईनांत तों इतक्यांत तेथें बिरबल कांहीं कामा करितां अकस्मित आला त्यास पाहून राणीनें जवळ बोलावून विचारिलें कीं, खुदावंत के पांव अच्छा का हमारे अच्छा याप्रमाणें बिरबलानें ऐकून म्हणाला तुमारे पांवतो अच्छा है पर खावंद के पाव अच्छा उस्से वास्ते ये तुमारे पांव अच्छा है खावंदके पाव अच्छा नही तो तुमारे कैसे अच्छा होगे याप्रकारें बिरबलाचें भाषण ऐकून राणी कुंठित झाली. आणि तो राग पोटांत ठेवून कपटानें बिरबलास शाबासकी देऊन जामदार यास हुकूम केला कीं, बिरबलको अच्छा पैजार देव असें ऐकून जामदार बोलला कीं, सबेर दीनको देऊं गे त्यासमयीं तिचें कपट जाणून बिरबल

म्हणाला हांजी राणी साहेब आपके मुपर जामदार-पैजार देनेका कबूल करता है पर हमको देवेगा वैसा भरोसा उसका दिकता नहि याप्रमाणें राणीनें ऐकून तिची समजूत न होतां क्रोधें करून बिरबलास म्हण-ते हमकू वैसा क्यातुनें कहा हमारे मुपर पैजार देनेका जामदार कबूल करता है क्या बिरबल म्हणाला खा-वंदने कैसा हम कों पैजार देनेका हुकूम कर राणी म्ह-णाली तुमकों पावमे पेहेरनेके वास्ते पैजार देनेका हुकूम करे थे पैजार मारनेका हुकूम नहीं करे बिरब-ल म्हणाला हमने वैसा अरज करे थे कि आपके मुप-र म्हणजे आपले समक्ष मजला पैजार देण्याचें जाम दार कबूल करीत आहे तुमचे तोंडांत किंवा तोंडावर मारण्याचें कबूल करतो असें कांहीं बोललों नाहीं. या प्रमाणें जसा राणीनें अर्थ फिरविला तसाच बिरब लानेंही आपले शब्दाचा अर्थ फिरवून तिची समजू-त केली. नंतर बादशहाचा हुकूम घेऊन घरीं आला.

## गोष्ट १७ वी.

## फूल, दान, पूत किस्सेका बडा.

एके दिवशीं बादशहा सर्वांचे पूर्वी कचेरीस ये-ऊन बसला आणि जो जो मनुष्य कचेरीस आला त्यास पांच सव्वाल करिता झाला. ते या प्रमाणें फूल किस्सेका बडा, दांन किस्सेका बडा, पूत किस्सेका बडा, सब् राजन् मो राजा कोन बडा, सब् गून मो गून कोनसा बडा असे पांच सव्वाल केले त्यासमयीं सर्व लोकांनीं मसलत केली कीं, सर्व मिळून एक विचारानें जबाब ठरवून बिरबलाचे पूर्वी बादशहास कळवावें असें बोलून विचार करीत बसले त्यांत जबाब ठरविले ते असे कीं, फूल जाईका. दांन हत्तीका, पूत राजन्का, राजन् मो बादशहा, गून मो विद्या गून. असे पांच बडे ठरवून सर्वांचे समुच्चयानें जबाब दिला तें ऐकून बादशहानें ते गैर मंजूर केले. नंतर बिरबल आला ते समयीं त्यास ही बादशहानें पहिले प्रमाणेंच सव्वाल केले. ते ऐकून बिरबलानें क्षणेक ही विचार न करितां तात्काळ जबाब दिले ते असे. फूल कपासीका बडा, याचा उपयोग सर्व दुनियेस लत्ताकपडा होत आहे, दांन नांगरका बडा ज्याचे योगानें सर्व धान्यें होतात. पूत

गौका बडा, ज्या पासून ओझीं वहाण्याची व शेनकी-
चा उपयोग होत आहे. सब् राजन् मो मेघराज बडा, ज्या
पासून सर्व जगाचें जीवन होत आहे. सब् गून मो हिम्म-
त बडी, हिम्मत बडी तो मदत खुदा. याप्रमाणें पांच-
सव्वालांचे जबाब बिरबलानें अर्थ सहित दिले ते बा-
दशहास व सर्व लोकांस मान्य झाले त्यांत पांचवे सव्वा
लाचा जबाब हिम्मत बडी म्हणून बिरबलानें सांगि
तलें त्याचा अनुभव बिरबला वरच प्रसंग आणून-
पहाण्या विषयीं बादशहानें ती गोष्ट मनांत ठेवून कां-
हीं दिवस गेल्यावर एके दिवशीं बिरबल नदी वरून-
स्नान करून घरीं येत असतां बादशहानें माहुतास हु-
कूम केला कीं, बिरबल घरीं जात आहे त्यास अडचणी-
चे गल्लींत हत्ती खिजाऊन त्याचे अंगावर घालावा. असा
हुकूम होतांच माहुतानें मस्त झालेला हत्ती आणून ल-
हान शा गल्लीनें बिरबल जात असतां हत्तीस खिजाऊन
त्याचे आंगावर चालविला तेव्हां हत्ती अंगावर येतो अ-
सें बिरबलानें जाणून आशीं पाशीं दगड धोंडा काठी इ-
त्यादि पाहूं लागला. तो कांहींच दिसेना त्यासमयीं बादश-

हास पांचवा जबाब दिल्याचें स्मरण झालें हें बादशहानेंच विघ्न उपस्थित केलें आहे असें जाणिलें नंतर हिम्मत धरून तेथें रस्त्यांत एक कुत्रें आडवें पडलें होतें त्याचे चारी पाय हातीं धरून हत्तीचे गंडस्थळावर फेंकिलें तें कुत्रें एकाएकीं घाबरून केंकाटलें आणि त्यानें पायाचे नखांनीं गंडस्थलास ओरखाडिलें त्यायोगानें हत्ती बिचकला. आणि भय पावून माघारा फिरला पुनः माहूत हत्ती फिरवून आणीत आहे तों बिरबल निघून गेला. नंतर सर्व वर्तमान माहुतानें बादशहास कळविलें तेव्हां हिम्मत बडी तो मदत खुदा हा जबाब सत्य आहे अशी त्याची समज होती झाली.

## गोष्ट १८ वी.

## बिरबलाचे मनुष्यांची परीक्षा.

एके दिवशीं बादशहा कचेरींत बसला असतां त्या दिवशीं मोठा दरबार नसून अल्पस्वल्प काम होतें तें बिरबल पहात होता. बादशहा रिकामाच बसला होता तेव्हां असें मनांत आलें कीं, बिरबल अक्कलवान् आहे तशींच त्याचे घरचीं मनुष्यें आहेत किंवा

कशीं आहेत हें स्वतः पाहून यावें असें मनांत आणून तसाच एकटा कचेरींतून निघून पांचच्यार मनुष्यें बरोबर घेऊन बिरबलाचे घरीं आला. तों तेथें उठबस किंवा विचारपूस करण्यास कोणी नव्हतें बायका मनुष्यें घरांत होतीं बादशहा ओटीवर जाऊन क्षणेकउगाच उभा राहिला. तेव्हां बिरबलाचा लहान मुलगा होता तो त्यास पाहून आपले बहिणीस म्हणाला ते आले असें ऐकून कन्या म्हणाली तें खरें पण तीं नाहींत असें दोघांचें भाषण ऐकून बिरबलाची स्त्री म्हणाली तसेंहि असतात आणि असें ही असतात या प्रकारें त्रिवर्गांचीं भाषणें ऐकून बादशहा कांहीं भाषण न करितां तसाच माघारा फिरून कचेरीस आला. आणि लोकांस सवाल करिता झाला कीं, ते आले, तीं नाहींत, तसेंहि असतात आणि असें ही असतात. या प्रकारें कचेरीचे लोकांनीं ऐकून कोणासही त्याचा कांहींच अर्थ कळेना तेव्हां शेवटीं बिरबलास तसेच सवाल करून जबाब विचारिला तेव्हां अकलेचे मानानें बिरबल म्हणाला यांत मूर्ख मनु-

ह्याचें लक्षण दिसत आहे.

विना कार्येण येमूढा गच्छंति पर मंदिरे
आवश्यं लघुतां याति यथा सूर्यग्रहे शशी॥

कोणी गृहस्थ घरीं नसतां त्याचे घरीं सभ्य मनुष्य मूर्खपणानें गेला असून त्यास घरांतील मनुष्यें बोलली असावीं तें असें:- ते आले म्हणजे बैल आले, तीं नाहींत म्हणजे त्यास शिंगें नाहींत. तसेंही असतात आणि असे ही असतात. म्हणजे शिंगांचे असतात आणि भुंडे ही असतात. याप्रमाणें जबाब ऐकून बादशहा आपले मनांत चूर आणि लज्जित झाला.

## गोष्ट १९वी.

## कालीपरकुत्राचदाहॆ.

एके दिवशीं बादशहा आणि बिरबल असे उभयतां बंगल्याचे सातवे मजल्यावर तिसरे प्रहरीं हवा घेत बसले असतां बादशहानें रस्त्याकडे नजर केली तों कुत्र्याचें मैथून दृष्टीस पडलें त्यांत कुत्री होती ती काळी होती आणि कुत्र्याचा रंग दुसरा होता त्या-

समयीं बादशहानें कुत्री काळी पाहून मनांत खोटे पणा आणिला कीं, बिरबलाचे आईचें नाव काळी होतें त्याजवर कल्पना बसवून कपटानें बिरबलाची उपहास्यता होण्याकरितां थट्टेनें म्हणाला अबे बिरबल ये देखो कालीपर कुत्ता चढाहै असें खोंचून बोलतांच तें बिरबलानें ऐकून त्याचे पोटांतील कपट जाणून तात्काळ त्याजवर युक्ति योजिली ती अशीकीं. बादशहाचे आईचें नाव न्यामत असें होतें आणि यवनी भाषेंत न्यामत म्हणजे उत्तम वाचक शब्द आहे असें जाणून बादशहास म्हणाला खुदावंत सबो आपकों ये कुत्री काली दिखती है लेकीन कुत्तेके मनमें वो न्यामत् है असें बिरबलाचें भाषण ऐकून बादशहाचा समज नहोतां क्रोधाविष्ट होऊन बिरबलास म्हणाला हमारी मां न्यामत् उस्से पर कुत्ता चढाहै ऐसा कैसा तुम बोलते हो बिरबल म्हणाला हमारी मा काली उस्से पर कुत्ता चढाहै ऐसी खावंदनें बात कैसी कही बादशहा म्हणाला काली कुत्री पाहून सहज काली कुत्रीप कुत्ता चढाहै असें मी बोललों

याप्रकारें बादशहानें अर्थ फिरवितांच बिरबल अर्थ फिरवून सांगता झाला. कीं, कुत्र्याचे मनांत ही कुत्री काळी म्हणजे वाईट असें कांहीं नाहीं न्यामत म्हणजे फार उत्तम सुंदर आहे असें त्याचे मनांत असून न्यामत कुत्रीपर चढा है असें मी बोललों. रवावंदांचे मातोश्रीचें नांव मी कशास घेऊं या प्रमाणें बादशहाची रवात्री चातुर्य तेनें बिरबल करिता झाला.

## गोष्ट २०वी.

## बिरबल बह्मन रांधित गाय.

बादशहानें आणि बिरबलानें अहोरात्र संघट्टण आणि थट्टा वगैरे कम्‌जाजती बोलणें विशेष असून बिरबलास कधीं कोणतेही समयीं क्रोध आला नाहीं याजकरितां बादशहानें त्यास क्रोध येण्यासाठीं थट्टा केली त्यांत आपलेवर शब्द न येतां बिरबलास क्रोध यावा असें भाषण केलें तें याप्रमाणें - बिरबल बम्हन रांधित गाय - अर्थ बिरबल हा ब्राह्मण होत्साता गाय शिजवितो असें बादशहा बोलला. त्याचे दोन्ही अर्थ समजून बिरबलानें क्रोध न-

मानितां बादशहासच क्रोध यावा अशा युक्तीनें भाषण आपलेवर शब्द न येण्या सारिखें बोलता झाला:- अकब्बर बादशहा शूकरखाय- अर्थ अकब्बर बादशहा यवन असतां डुकर खातो. असा बिरबलाचे बोलण्याचा अर्थ समजून बादशहास मोठा घुस्सा येऊन त्यास म्हणाला अबे बिरबल हम् क्या डुकर खाते हो ऐसा तुम गैर जबाब कैसा बोले. बिरबल म्हणाला हम् बंमन होके गाय रांधने क्या खावंद हमकूं यें कैसा बोले बादशहा म्हणाला हमने वैसा कहांके रांधने बखत बिरबल गाना हैं तान अलाफ-ते ना हें. याप्रमाणें बादशहानें अर्थ फिरवितांच बिरबलही अर्थ फिरवून म्हणाला महाराज, मी असें बोललों कीं, अकब्बर बादशहानें शूकपक्षी म्हणजे पोपट खाय म्हणजे बाळगला आहे. याप्रकारें उभयतांनी ही चातुर्य तेनें अर्थ फिरविले त्या योगें उभयतांस संतोष झाला.

## गोष्ट २१वी.

## बुंदसें गयी सो हौदसे ना आती.

एके समयीं वसंत ऋतूचे दिवसांत बिहार बागांत कचेरी करण्याचा हुकूम बादशहानें केला असतां बाग अत्यंत रमणीय त्यांत एक मनोहर परम सुशोभित असा बंगला होता त्यांत नन्हे नन्हेचीं विराजमान आरास करून रुजाम्याचे बिछाइतीवर सुशोभित नाना तऱ्हेचे वेलबुटीचे गालिचे आंथरून विस्तीर्ण जागेंत कचेरीचा थाट केला. तेथें संपूर्ण वजीर सरदार आणि उमराव तसेच सावकार आदी करून मोठमोठे लोक यथानुक्रमानें येऊन बसले आणि बादशहा गादीवर बसला असतां ती सभा विराजमान दिसूं लागली. बादशहासमीप बिरबल बसून न्याय मनसुबी दोन घटिका चालली असतां तेथें एक सौदागर फिर्याद आला त्यानें आपले फिर्यादीची हकीकत अर्जांत लिहून तो अर्ज बादशहापुढें टाकिला तेव्हां बिरबलानें तो अर्ज घेऊन बादशहास वाचून दाखविला त्यांतील हांशील मजकूर असा होता कीं, मी मावळ देशांतील रहाणारा असून बंगाल देशांत व्यापारास्तव गेलों होतों. तेथें एका-

सावकारा जवळ राजहंस पक्षी पाहिला. तो फार सुंदर आणि अत्यंत गुणवान् असून त्याचे पक्ष सुवर्णा सारखे आणि सर्वांगाची कांती अत्यंत विराजित असा दृष्टीस पडला. तो खावंदांचे मंदिरांत असण्यास योग्य असें मनांत आणून त्याचे मालकास त्या पक्ष्याची किंमत एकसहस्र रुपये देऊन खावंदांस नजर करण्या साठीं घेऊन आलों. घरीं आणून पिंजऱ्यांत ठेविला असतां माझे चाकर मनुष्यांतून कोणी एका दुर्जनानें तो पक्षी चोरून नेऊन त्यास मारून भक्षण केला असावा. असें चौकशीचे मानावरून दिसत आहे. असा तो पक्षी कोणी नेऊन मारिला ये विषयींची चौकशी होऊन चोर पकडला पाहिजे. या प्रमाणें ऐकून बादशहानें त्याचीं चाकर मनुष्यें आणून चौकशी केली त्यांत कांहीं मुद्दा अगर संदर्भ ही लागला नाहीं तेव्हां त्या मनुष्यांस सोडून दिलें त्यासमयीं तो सौदागर फार खिन्न होऊन बिरबला कडे दीन वदनें अवलोकन करून म्हणाला येथें न्याय मनसुबी कांहींच नाहीं असें त्याचें बोलणें ऐकून बिरबला-

नें पुनः त्याचे चाकर लोक कचेरीस आणून उभके-
ले आणि चवकशीस कांहीं अवकाश करून बोल
ला कीं. कायहो या चोराचें धारिष्ट तरी आहे.पक्षी-
मारून भक्षण केला आणि त्याचें पीस पागोट्यां-
त खोंचून कचेरीस आला आहे आणि चोरी कर्म-
केल्याचें नाकबूल करितो असें बिरबलाचें भाष-
ण सर्व लोकांनीं श्रवण केलें. त्यांत ज्यानें पक्षीमा-
रिला होता त्याचे मनास असें वाटलें कीं, न जाणो
चुकोन आपले पागोट्यांत पिसट आलें आहे काय?
असा संशय वाटून भयानें देहभान जाऊन कोणा-
चे लक्षांत न येण्या सारखें पागोट्यास हात लावून
पहाता झाला. तें कोणीही पाहिलें नाहीं परंतु बि-
रबलानें त्या सर्व चाकर मनुष्यांवर नजर ठेविली
होती त्यामुळें तें कृत्य त्यास दिसून आलें तेव्हां त-
त्क्षणीच त्या मनुष्यास पकडून मार देण्यास काढि-
लें तेव्हां तो माराचे भयानें सर्व कबूल होऊन हंसा-
चीं पिसें छपवून ठेविलीं होतीं तो मुद्दा ही दाखवि-
ता झाला. या प्रकारें चतुराईनें चोर पकडला. ते-

ह्मां सर्व कचेरींत बिरबलाची वहावा होऊं लागली नंतर कचेरी बरखास्त करण्याचा हुकूम बादशहानें केला त्या समयीं सर्व लोकांस विडेपान सुपारी आणि हार तुरे गजरे तसेंच सुवासिक पुष्पें आणि पान मोतिया आदिकरून परम सुवासिक अंतरें सर्वांस देत असतां अत्तराचा बिंदु खालीं पडला तो पुसून घेऊन अत्तर दानींत भरावा असें बादशहानें मनांत आणून तो बिंदु बोटानें घ्यावयास लागला परंतु तो तत्काळ बिच्छाईतीस जिरून जाऊन हस्तगत झाला नाहीं परंतु हें कृत्य बिरबलानें पाहिलें तो आतां कांहीं तरी दूषण ठेवील असें मनांत आणून दुसरे दिवशीं आपलें औदार्य बिरबलास दाखविण्याचे इरादानें पाण्याचा हौद मोकळा करून तो संपूर्ण अत्तरानें भरविला आणि सर्व शहरांतील लोक बोलावून त्याजकडोन तो लुटविला. त्या लुटीची मजा पहावयाचे निमित्त बिरबलास बरोबर घेऊन बादशहा त्या हौदाजवळ आला आणि बिरबलास म्हणाला कायों बिरबल कैसी मजा है.

बिरबल म्हणाला खुदावंत तकसीर माफ होना "बुंदसें गई सो हौदसें ना आती" याप्रकारें बिरबलाचें भाषण ऐकून बादशहास मोठा क्रोध आला आणि मनांत म्हणाला माझा हलकेपणा यानें प्रसिद्धीस आणिला परंतु आपले पासून गोष्ट झाली सबब क्रोध उघड दाखविण्यास अडचण जाणून तसेंच मनांत ठेविलें उप्रांत कचेरी बरखास्त होऊन सर्व लोक घरोघर निघून गेले.

दुसरे दिवशीं क्रोधामुळें बादशहानें बिरबलास नजर बंद केला आठ चार दिवस झाले तरीं नित्य सांप्रदाया प्रमाणें बादशहाचें बोलावणें नाहीं तेव्हां गैर मर्जी झाली आहे असें जाणून बिरबलास ही क्रोध येऊन दिल्ली शहर सोडून रुसून गेला आणि बादशहास आपला ठिकाण न लागावा म्हणून दूर देशीं माळवे प्रांतांत लहानशा खेडेगांवीं जाऊन एका कुणब्याचे घरीं बिऱ्हाड घेऊन आपलें नांव आणि गूण प्रगट न करितां गुप्तपणें राहिला. या गोष्टीस चार सहा महिने लोटले अकब्बर बादशहानें बि-

रब्लास कामावरून दूर करून मुलखांतून काढून लाविला. असा चारी मुलखांत पुकारा झाला. त्यायोगानें बादशहाचे शत्रूजन यानीं विचार केला कीं, अकब्बराचा प्रधान बिरबल तो अक्कलवान् असल्यामुळें आजपर्यंत आपला इलाज चालला नाहीं सांप्रत तो अकब्बरा जवळ नसून त्याचा ठिकाण नाहीं याजकरितां आतां त्यानें राज्य घेण्यास फारसा प्रयास नको असा शत्रूनीं विचार योजिला आणि लढाई करण्याच्या मसलती चालविल्या त्या सर्व अकब्बरास कळून आल्या तेव्हां अकब्बर चिंताक्रांत होऊन बिरबलाचा शोध करिता झाला. परंतु कोठें ही ठिकाण लागेना असें झालें तेणें करून काळजींत पडला. हें वर्तमान तुर्कस्थानचे बादशहानें ऐकून लढाई करण्याचें योजिलें परंतु प्रथम अकब्बराची अक्कल तोलण्या करितां एक पत्र लिहून स्वाराबरोबर पाठविलें त्यांत असें लिहिलें कीं, एक चडाभर अक्कल चार महिन्याचे आंत पाठवून द्यावी हें काम न होतां [illegible] यांप्रमाणें प-

त्र घेऊन सांडणी स्वार आला. त्यानें अकब्बरास पत्र दिलें तें पाहून अकब्बर मोठ्या विचारांत पडून मनांत म्हणाला बिरबला शिवाय या कामाची तजवीज व्हावयाची नाहीं आणि बिरबलाचा तर कोठें पत्ता लागत नाहीं. आतां यास काय करावें? नंतर बिरबलाचा शोध लागण्यास एक युक्ती काढिली ती अशी कीं, गांवो गांव एकेक एडका पाठवून दिला आणि तेथील अधिकारी यास हुकूम एकसाहां केला कीं, एडका वजन करून पाठविला आहे यास दर रोज चंदी वैरण मिळून पांचशेर सरकारांतून चारिली जाईल. या प्रमाणें एक महिना झाला म्हणजे हली एडका जितका वजन आहे तितकाच महिना अखेरीस भरला पाहिजे. कमज्याजती वजन भरल्यास प्राणांत शिक्षा मिळेल. या प्रमाणें हुकूम लिहून गांवोगांवीं एकेक एडका आणि एकेक मनुष्य बरोबर देऊन एक महिन्याची चंदी वैरण सुद्धां बादशहानें पाठविली. तेव्हां ज्या गांवांत बिरबल होता त्या गांवीं एडका आणि हुकूम आला तेव्हां बिर-

बलानें मनांन आणिलें कीं, ही नजवीज माझे शो-
धार्थ बादशहानें केली आहे यास्तव आतां युक्ती-
नें प्रगट व्हावें असें मनांन आणून त्या गांवचे वेणा-
जी नामक पाटलास सांगितलें कीं, तुमच्या आश्रया
स आज पर्यंत मी राहिलों त्या उपकाराचा उपयोग
मजपासून कांहीं घडला नाहीं. यास्तव सांप्रत तुम्हां
वर संकट प्राप्त झालें आहे त्याचे निवारणाची नज-
वीज मजला सुचली आहे ती सांगतों त्याप्रमाणें क-
रावें म्हणजे संकट दूर होईल. असें ऐकून वेणाजी-
पाटील म्हणाला एवढी नजवीज काढल्यास तुमचे
उपकार जन्मभर आठवीन. बिरबल म्हणाला. तुम-
चे गांवांन दरवेशी आहे त्यानें सांपळ्यांन वाघ ठेवि
ला आहे त्या वाघा समोर दररोज एडका क्षणभर बां
धावा म्हणजे त्याचे भया मुळें दररोज दाणावैरण
खाऊन रक्त वृद्धि होईल ती शोषण होऊन व्यर्थ जा-
ईल आणि हल्लीं [illegible] जितका वजन आहे तित-
काच महिन्याचे अखेरीस वजन राहील. कमीज्या
स्ती होणार नाहीं. पण ही नजवीज मी सांगितली-

असें कोणास समजूं नये. याप्रमाणें पाटील यानें ऐकून नशीच तजवीज चालविली. असतां महिना अखेरीस एडका पहिले इतकाच वजन भरला. तो बादशाहाकडे नेऊन हजीर केला. बादशाहानें गांवों गांवचे एडके वजन केले ते कमी जाजती भरले वेणाजी पाटील यानें आणिलेला मात्र बरोबर भरला. त्याजवरून वेणाजीचेच गांवीं बिरबल असून त्याचे अकलेचे तजविजीनें हें काम झालें असावें असें खचीत समजून त्या पाटलास खरें वर्तमान विचारितां त्यानें सांगितलें कीं, आमचे घरीं फिरस्ता पाहुणा आहे त्यानें सांगितल्या प्रमाणें केलें असें ऐकून बादशहानें तात्काळ सेवक आणि सरंजाम पाठवून मोठ्या इतमामानें बिरबलास आणिलें आणि नवीन जाजती इनाम सरंजाम देऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें तात्काळ देवून हुद्यावर नेमिला नंतर तुर्कस्थानचे बादशाहाकडून आलेलें पत्र त्यास दाखवूनं घडाभर अक्कल पाठविण्याची तजवीज करण्यास सांगितलें त्याउप्पर बिरबलानें एक कडू-

भोंपळ्याचें अळें घातलें तें कांहीं दिवशीं लागास ये-
तांच त्याचे एका फळास बाहेरून घागर लावून त्या-
घागरींत तें फळ वाढे अशी तजवीज केली. नंतर तें
फळ दिवसें दिवस वाढून मोठें होत होत घागरभर प-
सरून घागरीचे तोंडा बाहेर बुडरवा निघाला आ-
णि तें फळ पक्कें जून झालें तेव्हां घागरीचे तोंडास म-
जबूद कापड बांधिलें आणि बादशहास सांगितलें
कीं, घडाभर अक्कल तयार झाली. आतां तुर्कस्थान
चे बादशहाकडे रवाना करावयाची असें सांगून बि-
रबलानें तात्काळ त्यास पत्र लिहिलें त्यांत मजकूर
असा लिहिला कीं, घडाभर अक्कल सबंध पाठवि-
ली आहे त्यास घड्यास धक्का न लागतां आणि अ-
कलेचा चूर न करितां सबंधचे सबंध अकलेचा गड्डा
काढून घेऊन घडा परत पाठवून द्यावा. असें न हो-
तां घड्याचा अगर अकलेचा नाश केल्यास सदहू
अकलेची किंमत तीनकोट रुपये पाठवून द्यावे या-
प्रमाणें न होईल तर युद्धास सिद्ध व्हावें आह्मां कडू-
न तयारी आहे या प्रकारें पत्रांत लिहून बादशहा-

ची मोहोर करून तें पत्र अकलेच्या घड्यास उंची वस्त्रें वेष्टणें लावून तो स्वारा बरोबर देऊन तुर्कस्थानचे बादशहा कडे पाठविला तेव्हां स्वारानें नेऊन-तेथील बादशहाकडे प्रविष्ट केला. तेव्हां त्यानें आलेलें पत्र वाचून पाहिलें आणि आपले मुत्सद्दी दिवाण सरदार, उमराव आदिकरून प्रमुख प्रमुख बोलावून आपून त्यांस पत्रांतील हांशील मजकूर कळविला आणि तो अकलेचा घडा मोकळा-करून सर्वांस दाखविला. व सबंध अक्कल काढून घेण्याची तजवीज करून पहावयास लागले परंतु कांहीं इलाज चालेना तेव्हां अकबुराचे पदरीं अक्कलवान् लोक आहेत असें समुच्चयास येऊन-म्हणतात अकब्बर याची चढाई दिसते. लढाईचा प्रसंग केला असतां तो जबरदस्त आहे आपला-परिणाम लागणार नाहीं. अक्कल सबंध काढून घेऊन घडा परत पाठविण्याचें हें अवघड काम आहे त्या पेक्षां तीन कोट रुपये द्यावे. हें चांगलें. असा सर्वांचे मतें इत्यर्थ ठरून तीन कोट रुपये अकब्बर

बादशाहा कडे पाठवून दिले आणि नष्ट करून घे-तला. या प्रमाणें बिरबलाचा उपयोग अकब्बरास हमेशा होत असे.

## गोष्ट २२ वी.

## पादण्याविषयीं.

एके दिवशीं बादशाहा आणि राणी उभयतां रंगमहालांत विषयानंदें क्रीडत असतां राणीची शरीर प्रकृति त्या दिवशीं बरोबर नसून भोजन विशेष झालें होतें. त्यांत वातूळ पदार्थ विशेष सेवनांत आला होता यामुळें गुदद्वारें वायू सरला. त्यानें दुर्गंधी चालली तें बादशहानें पाहून क्रोधयुक्त होत्साता तात्काळ राणीस रंगमहालांतून बाहेर काढून लाविली. आणि नजर बंद शिक्षा देऊन राजवाड्या बाहेर बागांत बंगला होता त्यांत राहण्यास सांगितलें तदनंतर दुसरे दिवशीं बादशहा कचेरीस येऊन कचेरीचे लोकांस पृथक् पृथक् विचारिलें कीं, तुम्ही पादते हो? त्यांनीं ऐकिलें होतें कीं, राणीसाहेब पादल्यामुळें तिजवर इतराजी झाली यास्तव बादश-

हाचें भाषण ऐकून प्रत्येकानें सांगितलें कीं, हम् पादते नहिं. असें सांगितल्यावरून त्यांजवर प्रसन्न मर्जी झाली. त्या दिवशीं बिरबल कचेरीस आला नव्हता. यामुळें त्यास विचारणें राहिलें. नंतर कांहीं दिवसांनीं स्मरण होतांच बिरबलास ही विचारिलें. बिरबल तुम् पादते हो. बिरबल म्हणाला सर्व दुनिया पादते या प्रमाणें बादशाहानें ऐकून क्रोधें करून म्हणाला कचेरीके सब् लोक पादते नहिं ओर तुम कैसा पादते पादने तो कचेरीमे बिना होकाम मत आव. याप्रमाणें बिरबलावर ही गेरमर्जी झाली. नंतर कांहीं एक दिवशीं राणीनें बिरबलास बोलावून नेऊन बादशाहाची आपलेवर गेर मर्जी होण्याचें कारण सर्व कळविलें. आणि काकुलतीस येऊन हात जोडून म्हणाली कीं, खावंदांची आणि माझी पूर्वी सारखी प्रीती होण्याची तजवीज तुज वांचून दुसऱ्याचे हातून व्हावयाची नाहीं यास्तव मेहेरबानी करून आमचा उभयतांचा ऐक्यपणा होईल असें करावें.

या प्रमाणें राणीनें बोलणें ऐकून बिरबल म्हणाला मी ही पादतों म्हणोन सांगितलें त्याजवरून मजवर ही गैर मर्जी झाली आहे. राणी म्हणाली- तुजवर गैर मर्जी असेल तथापि तूं चतुराईनें सर्व तजवीज करशील. तेव्हां बिरबल म्हणाला या- कामास लक्ष रुपये पाहिजेत असें ऐकतांच राणी- नें तात्काळ लाख रुपये बिरबलाचे पदरीं घातले- नंतर बिरबलानें एक कारागीर सोनार अत्यंत कुशल पाहून त्यास सांगितलें कीं, जसें शाळूचें कणीस भरदार असतें त्या प्रमाणें बावन्न कशी सोन्याचे कोंदणांत अत्युत्तम ढाळदार अशीं चांगलीं उत्तम अछेद घांसदार मोत्यें बसवून हुबेहूब कणीसच काय? असें मोजेचें कणीस सुंदर तयार करून द्यावें द्रव्य लागेल तितकें खर्च करण्यास हरकत नाहीं या- प्रमाणें सांगितलें, नंतर त्या कारागिरानें सांगितल्या ही पेक्षां अती उत्तम कणीस बनवून बिरबलाचे स्वाधीन केलें. बिरबलानें तें मोत्यांचें कणीस घेऊन कचेरीस आला आणि बाहेरून बादशाहा-

सवर्दी कळविली कीं, कांहीं मोठे कारणास्तव खावं दांची भेट घेण्यास परवानगी मागत आहे. असें सांगून पाठविल्या वरून बादशहानें कचेरीस येण्याची परवानगी दिली. तेव्हां कचेरीस जाऊन मोत्यांचें कणीस बादशहास दाखवून बोलता झाला कीं, हें मोत्यांचें कणीस अति सुंदर आणि अमोल्य द्वीपांतराहून आणविलें आहे, हें चांगल्या भूमीवर चांगल्या रीतीनें चांगले मनुष्याचे हातून पेरलें असतां शाळूसारखें शेत उगवून त्याजवर अशींच मोत्यांचीं कणसें येतात. याज करितां हें आपले सारखे श्रीमान् लोकां शिवाय दुसऱ्याच्यानें व्हावयाचें नाहीं आणि त्याची मजबीज जशी केली पाहिजे तशी दुसऱ्याचे हातून होणें अवघड यास्तव खावंदांनीं हें काम अवश्य केलें पाहिजे आणि खावंद करण्यास योग्य आहेत. या प्रकारें ऐकून बादशहास मोठा आनंद होऊन मोत्यांचें शेत करण्याचें मनांत पक्कें ठसलें. नंतर बिरबलास हुकूम केला कीं, या शेतास जमीन चांगली कशी असावी ती नेमून देवून नांगरून

तयार करवावी. असा हुकूम होतांच बिरबलानें सर्व शहरांत फिरून जमीन तेमिली. ती जेथें त्याचें अनहित करणारे लोकांचीं घरें मोठ्या इमारती होत्या ती जागा तेमून बादशहाकडून त्या त्या इमारती मोडण्या विषयीं एकंदर हुकूम आणिला तो असा कीं, जी जी जागा योग्य दिसोन येईल तेथील इमारती वगैरे अडचणी असतील त्या काढून टाकाव्या. असा एकसहा हुकूम आणून बिरबलानें आपले दुर्जन आणि शत्रु यांच्या मोठ्या मोठ्या हवेल्या होत्या ती ती जागा तेमून हवेल्या मोडण्या विषयीं बादशहाचा हुकूम त्यांस दाखविला. त्यासमयीं ते लोक बिरबलाचे कानी लागून बोलते झाले कीं, शेला पागोट्या बद्दल आह्मा जवळून कांहीं द्रव्य नजर घेऊन आमच्या इमारती बचाविण्याची तजवीज करावी. असें त्यांचें बोलणें ऐकून कोणापासून पांच हजार कोणापासून दहा हजार पंचवीस हजार असे रुपये रोख घेतले ते एकंदर दोन-तीन लक्ष जमा झाले. तंतर लोकांचे घराची जा-

गा सोडून हलक्या इमारती होत्या त्यांची किंमत त्या त्या गरीब लोकांस देवून दोनबिघे जमीन तयार केली ती नांगरून चांगली वजावून पेरण्यासारखी तयार केली आणि पाभर जुंपून बादशहास वर्दि दिली कीं, जमीन तयार होऊन पाभर जुंपून तयार केली आहे त्यास कचेरींतील सर्व लोक समागमे घेऊन स्वतः खावंदांनी तेथें आलें पाहिजे. याप्रमाणें बादशहास कळवून मंडळी सहित बादशहास तेथें आणिलें नंतर बिरबल म्हणाला. खुदावंत हें काम फारमोठें महत्कृत्य आहे हीं मोत्यें पेरणारा मनुष्य शुचिर्भूत निर्मळ पाहिजे पापरे-मनुष्यानें पेरिलीं असतां उगवणार ही नाहींत याजकरितां जो मनुष्य पादत नसेल त्याचे हातून पेरणी झाली पाहिजे आपले पदरीं न पादणारे लोक पुष्कळ आहेत त्यांतून हरकोणास हुकूम होऊनसा जावा. याप्रमाणें बादशहानें ऐकून एकएकअसामीस बोलावून आपून मोतीं पेरण्याविषयीं सांगितलें. जो तो म्हणूं लागला मी पादतों असें-

म्हणून कोणी मोतीं पेरण्याचें कबूल करीनासा-झाला. या प्रमाणे तेथें हजारों लोक होते त्या सर्वांनी ही पेरण्याचें नाकबूल केलें. बादशहाने मर्जीस्तव-पादत नाहीं असें म्हणून मोतीं पेरिलें असतां उगव-लीं नाहींत म्हणजे सर्व खर्च भरून द्यावा लागेल आ-णि समयीं डोकें ही मारलें जाईल. याजकरितां कोणी ही पेरण्यास सिद्ध झाला नाहीं आणि पादल्या शिवा-य कोणी ही मनुष्य नाहीं हें ही खरेंच असल्यामुळें सर्व लोक मागें सरले तेव्हां बादशहा म्हणाला अबे बिरबल तुम् पादते बिरबल म्हणाला खावंद हम् प-हिलेच पादनें वेसा कहदिया है पण पूर्वी सर्व लोकां नीं पादत नाहीं असें खावंदांचे जवळ कबूल केलें अ-सून हल्लीं एकही नपादणारा कोणी आढळत नाहीं हें आश्चर्य आहे. आतां सर्व लोक पादणारेच ठरले प-रंतु खावंद जातीनें तर न पादणारे आहेत यास्तव स्व-त: मोतीं पेरण्याचें काम जातीनें केलें पाहिजे याप्र-माणें ऐकून बादशहा म्हणाला बिरबल सुनो हम्बी पादते. सब् दुनियांमो पादे बिना कोईबी निकलनेका

नहिं. याप्रमाणें बादशहाचें बोलणें ऐकून बिरबल म्हणाला खुदावंत सुनो हम पादते तुम पादते सब दुनिया पादते फेर हमने और राणीसाहेबनें क्या चोरी क्या गुन्हेगारी कियाहै जो उसको और हमकों नजर बंद करे हैं या प्रमाणें बिरबलाचें भाषण ऐकून बादशाहानें मनांतील क्रोध सर्व सोडून राणीचा अंगिकार पूर्ववत प्रमाणें करिता झाला. आणि बिरबलास दिवाणगिरीचे कामावर पहिले प्रमाणें नेमिता झाला.

## गोष्ट २३ वी.

## और क्या.

एके दिवशीं बिरबल आपले स्नेही याचे घरीं भोजनास गेला होता त्यामुळें त्यादिवशीं कचेरीस जाण्यास उशीर लागला तेव्हां बादशहानें उशीर लागण्याचें कारण विचारिल्यावरून स्नेही यांचे घरीं भोजनास गेलों होतों म्हणोन बिरबलानें सांगितलें तेव्हां बादशहा म्हणाला भोजनाचा कसा काय बेत केला होता आणि कायकाय पदार्थ-

होते बिरबल म्हणाला दर एक पात्राभोंवतीं चित्रवि-
चित्र रंगाची वेलबुटीदार सुंदर रांगोळी आणि चंद-
नाचे पाट सुवर्णाच्या फुल्यांचे, पात्रापुढें समयी आ-
णि सु[illegible] अगरबत्या लाविल्या होत्या सव्वा-
हात [illegible] ळीचे पात्रावर रुप्याचीं तारें आ-
णि शंजारा सुवर्णाच्या वाट्या या प्रमाणें थाट मां-
ड उत्तम प्रकारचा होता. असें सांगत असतां बाद-
शहा दरएक शब्दास औंर औंर असें म्हणत असे
आणि औंर म्हटल्यावर बिरबल दुसरे पदार्थाचें
नाव घेऊन सांगत असे या प्रमाणें भोजनाचे सर्व
पदार्थ वरण, भात, भाज्या, चटण्या, कोशिंबिरी आ-
दी करून सर्व पदार्थ सांगितले तितक्यास औंर-
औंर बादशहा म्हणत असून बिरबलानें सर्व प-
दार्थ सांगितले त्यांत एक पदार्थ सांगणें राहिला
बादशहा औंर म्हणणार तों इतक्यांत दुसरें कांहीं
निकडीचें काम आलें त्यामुळें औंर म्हणावयाचें-
राहिलें अस्तमान होतांच कचेरी बरखास्त झाली.
नंतर त्या गोष्टीस चार सहा महिने गेल्याउपांत बा

दशहास अवचित स्मरण झालें कीं, बिरबलास भोजनांतील पदार्थ विचारणें राहिले आहेत ते अकस्मात् विचारले असतां बिरबलानें स्मरण आणि तार्किक्य किती आहे तें कळोन येईल असें मनांत आणून बिरबल कचेरीस येतांच बादशहा म्हणाला अबे बिरबल्ल और असें म्हणण्या बरोबर तात्काळ बिरबल सांगता झाला. और तो कढी याप्रमाणें ती त्याची स्मृति धारणा विशेष पाहून बादशहास विस्मय वाटून आनंद होता झाला. आणि प्रसन्न मर्जीनें तात्काळ आपले गळ्यांतील मोत्यांची कंठी काढून बिरबलास बक्षीस देऊन त्याचे गळ्यांत घातली. त्या समयीं बादशहाचे ज्ञातीचे लोकांस वाटलें कीं, बादशहास कढीची प्रीती विशेष आहे असें समजून दुसरे दिवशीं त्या लोकांनीं उत्तम प्रकारची कढी करून एकेक घागर भरून डोकीवर घेऊन बादशहाचे वाड्यांत येते झाले त्यांचा गलबा ऐकून बादशहा सेवकांस म्हणाला काय का दंगा हे तेव्हां मोठ्या प्रीतीनें लोक पुढें होऊन त्या-

वंद् के वास्ते कदी लाई है या प्रमाणें त्यांचें बोलणें ऐकून बादशहास मोठा क्रोध आला. आणि सेवकांस हुकूम करिता झाला कीं, जिसके शिरपर कदी उसके पांवमे बेडी डारो. ये सबलोक गद्धे हे जे बिरबलनें कदी कहे सो कदी की बात अवूर है या प्रमाणें बादशाहाचें बोलणें ऐकतांच ते सर्वलोक भयाभीत होत्साते बादशहास पदर पसरून गुन्हा माफ करून घेते झाले.

## गोष्ट २४वी.

## और तर भुर.

प्रति दिवशीं रात्रौ मुत्सद्दि आदि करून मोठमोठे चाकर लोक यांनीं फेर पाळी प्रमाणें बादशहास करमणुके करितां कांहीं तरीं गोष्ट सांगावी असा नित्यानित्य क्रम होता त्या प्रमाणें एके दिवशीं गोष्ट सांगण्याची पाळी बिरबला कडे आली तेव्हां बारीप्रमाणें ते मिळेल्या वेळेस बिरबल येऊन हजीर झाला आणि गोष्ट सांगूं लागला तेव्हां नित्या प्रमाणें सांगणाराचे दहावीस शब्द झाले म्हणजे बादश -

हानें ओंर अशीं दोन अक्षरें बोलत असावीं त्याप्र-
माणेंच चार घटिका होऊन गेल्या बिरबल फार श्रा-
मला तथापि बादशहा म्हणाला अबे बिरबल ब-
हात बडी लंबी ऐसी कहानी सुनाव. तेव्हां बिरबल
मनांत म्हणाला कीं, मी पंचवीस शब्द बोलेन तेव्हां
बादशहा ओंर उनकें म्हणणार त्यास श्रम कांहींच-
नसून मजला मात्र श्रम होणार याजकरितां बाद-
शहा पेक्षा आपल्यास फार श्रम न होतां गोष्ट कधीं-
च नसरेल अशायुक्तीनें गोष्ट सांगितली पाहिजे अ-
सें मनांत आणून सांगता झाला. कोणी एक कु-
णबी शेतकरी होता त्यानें हजार पांचशें चाहूर ज-
मीन तयार करून त्यांत शाळू पेरला पर्जन्य पाहि
जे तसा पडल्यानें शाळूचें शेत उत्तम प्रकारें पिकास
आलें तेव्हां शाळूचे कणसास पाखरांचा उपद्रव -
फार होऊं लागला. त्यासमयीं जागजागीं माळे घा-
लून राखण चालविली असतां एके दिवशीं त्याशे
तावर अशीं पाखरें येऊन बसलीं त्यांची गणती न
होणें नाहीं. अशीं अपरमित पाखरें येऊन दाणा-

खाऊं लागलीं तेव्हां त्या कुणब्यानें दगडाचा मार करि तांच तीं पाखरें एकेक उडून जाऊं लागलीं बादशहा म्हणाला और तेव्हां बिरबल म्हणतो त्या पाखरांचे पक्ष उडण्याचे वात वेगानें भुर असे शब्द साररव वाजते झाले बादशहा म्हणाला. और बिरबल म्हणाला भुर्. असें और भुर् पांच पन्नास वेळ उभयतांचे शब्द झाले तेव्हां बादशहा म्हणाला अबे बिरबल हें भुर् असें बोलणें तुझें कधीं संपणार बिरबल म्हणाला पाखरेंच अपरमित होतीं तीं सर्व सरत पर्यंत भुर् हा शब्द कसा सरेल बादशहा म्हणाला तर ही तुझी गोष्ट शेवटास कधीं जाणार बिरबल म्हणाला ऐकणाराची शक्ति असोन वर्षो वर्षे सांगत बसलें तरी सरणें नाहीं या प्रमाणें ऐकून बादशहा म्हणाला. ऐसी तेरी कहानी बडी लंबी हॅ सो रहने देव. हमको निंद आती हॅ बिरबल मनांत म्हणतो मी ही अशीच इच्छा करीत आहें असें चित्तांत आणून बादशहा ची रजा घेऊन घरीं जाता झाला.

## गोष्ट २५ वी.

## शहरांत कावळे किती याविषयीं.

एके दिवशीं बादशहा कचेरीस बसला असतां कचेरींत जेजे लोक आले त्यांस विचारिता झाला कीं, आपले शहरांत कावळे किती आहेत. याप्रमाणें प्रत्येकास विचारिलें परंतु कोणाही एकाच्यानें कांहीं जबाब देववला नाहीं उपरांत बिरबल कचेरीस आला तेव्हां त्यासही याप्रमाणेंच विचारिलें कीं, आपले शहरांत कावळे किती आहेत असें ऐकतांच विचार किंवा अवकाश न करितां बिरबल म्हणाला खावंद सुनो एक हजार तीनशें बावन्न इतके आहेत. याप्रमाणें ऐकून बादशहा म्हणाला बिरबल त्वां प्रत्यक्ष मोजून पाहिल्यासारखीच संख्या सांगितलीस हें मोजण्याचें काम कधीं केलें होतेंस एवढी फुरसत कधीं सांपडली असेल असें दिसत नाहीं याजवरून तूं असत्य बोलत आहेस असें खचीत वाटतें यास्तव त्वां सांगितलेसंख्येंत कमी अगर जाजती असल्यास दहा हजार रुपये दंड द्यावा लागेल. याप्रमाणें ऐकून बिरबल म्हणाला मी संख्या सांगितली इतके कावळे शहरांतीलच-

खचीत आहेत मी असत्य बोलत नाहीं पण सांप्रत-आतांच मोजल्यास कमी आले तर सांगितले सं-ख्येंतून बाहेर गांवीं पाहुणे गेले असतील किंवा जा जती भरले तर बाहेरील गांवाहून पाहुणे आले असतील असें झालें असेल तर मजकडे शब्द-नाहीं. असें झालें नसल्यास मी सांगितली ती सं-ख्या सत्यच आहे या प्रमाणें यथायुक्त बिनतोड जबाब सांगितला. कदाचित् बादशहानें मोजून पाहिलें तरीं ठिकाण लागणें दुर्घट तथापि मोठ्या यत्नानें मोजिले असतां ही पाहुणे किती आले व किती गेले तें ही खरेपणानें कळणें दुर्घट अस-ल्यामुळें बादशहाचें बोलणें कुंठित झालें.

## गोष्ट २६ वी.

### विहिरीचें लग्न आणि हत्तीचें पाऊल.

एके दिवशीं बिरबलावर कांहीं कारणावरून बादशहाची इतराजी झाल्यामुळें बिरबल रुसोन-दिल्ली शहर सोडून दूर देशीं मथुरा प्रांतीं निघोन गे ला. आणि बलसूर नामें एक खेडें होतें त्याखेड्यां-

सदर्हू हुकूम अमान्य करून जो न येईल त्यास दहा हजार रुपये दंड द्यावा लागेल. या प्रकारें जाहिरात देशोदेशीं व महालो महालीं गांवों गांवीं खेड्या पाड्यानी हाय् स्कत्वां फिर विल्ली नी मथुराप्रांतीं बलसूर खेड्यांत बिरबल रहात होता तेथें आली तेव्हां त्या खेड्याचा अधिकारी गवालजर खेत्री होता त्यानें तो हुकूम ऐकून आपले गांवांतील लहान थोर मनुष्यें चावडीवर जमा करून त्यांस हुकूम जाहीर करून म्हणाला कायहो बादशहा अत्यंत मूर्ख आहे. पहा गावों गांवच्या विहिरी आणण्या विषयीं हुकूम केला. त्यास या बादशहाचा बाप जरी आला तरी त्याच्यानें हें काम होण्या सारखें नाहीं जें ईश्वरास ही दुस्तर तेथें आह्मीं मनुष्यांनीं कसें करावें आणि हुकूम अमान्य केल्यास दहा हजार रुपये दंड द्यावा लागेल. असें हुकुमांत लिहिलें आहे, आतां तजवीज काय करावी. असें बोलून चिंताक्रांत सखेद झाला. तेव्हां त्या समस्त मंडळींत बिरबल ही आला होता. त्यानें सर्व वर्तमान ऐकून बाद-

शहानें माझा शोध लागण्यास्तव ही युक्ती योजिली आहे असें जाणिलें. नंतर मनांत म्हणाला. आतांच प्रगट व्हावें त्यापेक्षां बादशहाचे हिकमतीस यश येऊन प्रगट झालें असतां त्यांत त्याचें आणि आपलें महत्व आहे असें मनांत आणून गवाळज खेत्री यास म्हणाला. तुह्मीं काळजी न करितां स्वस्थ असून मी तजवीज सांगतों अशी करावी. म्हणजे सर्व संकटनिवारण होईल आणि मी तुमचे आश्रयास राहिलों या उपकाराची उत्तीर्णता ही होईल. असें बोलून युक्ती सांगता झाला. ती अशी. तुह्मीं सर्व अधिकारी लोक दिल्लीचे सिमेवर जाऊन उतरा आणि बादशहास सांगून पाठवा कीं, आह्मीं आपल्या गांवच्या विहिरी घेऊन सीमेवर हजर झालों आहों. त्यास तुमचे शहरांतील विहिरी सामोऱ्या घेऊन याल तर आमच्या विहिरी पुढें येतील. या प्रमाणें तुह्मीं निरोप पाठविला असतां शहरांतील विहिरी बाहेर येणें नाहींतच त्यायोगानें बादशहा निरुत्तर होऊन तुह्मांस गुन्हा माफ करील. याप्रमाणें बिरबलानें हिकमत सांगितली.

नी प्रमाण दिसून आली. तेव्हां त्याप्रमाणेंच त्या गावांतील सर्व अधिकारी दिल्ली शहराचे सिमेवर येऊन बिरबलानें सांगितल्या प्रमाणें बादशहास निरोप पाठविते झाले. तो निरोप ऐकून बादशहा मनांत समजला कीं, त्या गांवचे अधिकारीयाने ही तजवीज काढिली त्यात गांवांत बिरबल असून त्यानें ही युक्ती अधिकाऱ्यास सांगितली असावी. यांत संशय नाहीं असें जाणून गवालज खेत्री बलखूर गांवचा पाटील यांस विचारिलें कीं, तुजला ही युक्ती कोणी सांगितली तेव्हां तो म्हणाला महाराज आमचे गांवांत कोणी नवीन गृहस्त राहिला आहे त्यानें ही युक्ती सांगितली. याप्रमाणें बादशहानें ऐकून तोच बिरबल असें खचित जाणून तात्काळ गवालज खेत्री याजबरोबर सेवकजन हत्ती घोडे, पालखी इत्यादि सरंजाम देवून मोठ्या इतमामानें बिरबलास दिल्ली मुक्कामीं आणून पूर्वींचा दिवाणगिरीचा हुद्दा देऊन सर्व बदोबस्त करण्या विषयीं सांगितलें नंतर महिना पंधरादिवसांत बिरबलानें सर्व यथास्थित बंदोबस्त केला. उपरांत एके दिव-

शीं बादशहाची स्वारी शहरा बाहेर गेली असून माघारे फिरल्यावर पूर्वींचें स्मरण झालें कीं, हुसेन अली यास हत्तीचें पाऊल राखण्याचें काम सांगितलें होतें तसेंच त्याही समयीं धुरळ्यावर हत्तीचें पाऊल उमटलेलें पाहून तें राखण्याविषयीं बादशहानें बिरबलास सांगून घरीं निघून गेला नंतर बिरबलानें त्या पाऊलाचे जाग्यावर लोखंडाची मेख ठोकून त्या मेखेस दोन तीन शें हात लांबीच्या कादण्या बांधून सभोंवत्या दोऱ्या सडकल्या त्यांत जितकी जागा सांपडली त्या जाग्यांत कित्येक लोकांच्या हवेल्या व घरें वगैरे मोठमोठ्या इमारती आल्या त्या त्या लोकांस सांगितलें कीं, या वेळेस आपल्या इमारती मोडून न्याव्या नाहींतर सरकारांतून मोडल्या जातील. आणि नुकसान मिळणार नाहीं. कारण बादशहानें हत्तीचें पाऊल रक्षण करावयास सांगितलें आहे. त्याचे आसमंतात् दोनशें हात जाग्यांत अडचण उपयोगीं नाहीं या प्रकारें बिरबलाचें भाषण ऐकून सरदार व सावकार लोक ज्यांच्या इमारती होत्या त्यांनीं हजार पांचशें हजार पां-

चशें असे रुपये बिरबलास शेला पागोट्या बद्दल देऊ-
न इमारती मोडण्याचें महकूब करविलें या प्रमाणें ए-
क दिवसांत एक लक्ष रुपये गोळा करून बादशहाचे
खाजगी जामदार खान्यांत जमा करून पावती घेऊन
अस्लमानीं बादशहास आणून दिली. त्या समयीं बा-
दशहानें आपला शालक जो हुसेन अल्ली त्यास बोला-
वून आणून दाखविलें कीं, हत्तीचें पाऊल राखण्याचें
काम तुजला सांगितलें होतें तसेंच बिरबलास ही
सांगितलें त्वां फायदा काय करून आणिलास तो
सांग तुजला तीन दिवसांची फुरसत दिली होती आ-
णि बिरबलास तर एक दिवसच तें काम सांगितलें
असून एक लक्ष रुपये त्यानें जामदार खान्यांत चा-
तुर्य तेनें मिळवून जमा केले. तुझ्यानें एकही पैसा
फायदा न होतां तीन दिवस कष्ट भोगलेस अशा मंद
बुद्धीस दिवाणगिरीचें काम काय उपयोग याप्रकारें
त्याची फजीती करितांच तो लज्जायमान झाला.

## गोष्ट २७ वी.

## तानसेन व बिरबल यांची परीक्षा.

बादशाहाचे पदरीं तानसेन नामें एक यवन गायन कलेंत परिपूर्ण गुणवान् होता त्याला गायना विषयीं गंधर्वाचीच उपमा देण्या सारखा गुणवान् होता. संपूर्ण राग रागिणी ज्यास अवगत ज्याचे कंठाचे ठायीं प्रत्यक्ष येऊन राहिल्या या प्रकारचा तो गुणी सर्व पृथ्वींत मान्य होता त्याचे गुणाचा अभिमान त्यास विशेष नव्हता. पण त्याचे जातीचे लोक यांस त्याचा अभिमान फारच असून ते सर्व लोक बिरबलापेक्षां तानसेन अधिक श्रेष्ठ असें मानून बिरबलापाशीं अत्यंत स्पर्धा वाढविली आणि बादशहा जवळ तानसेनाची विशेष प्रशंसा वाढवून सांगत असत. एके दिवशीं बादशाहा त्यांस म्हणाला कीं, तानसेन कितीही गुणी असला तरीं बिरबलाची साम्यता करण्यास योग्य नाहीं. याप्रमाणें यवन लोकांनीं ऐकून उगाच राहिले. नंतर कितीएक दिवसांनीं यवन लोक यांनीं एका बंगल्यांत सर्वोत्कृष्ट आरास करून तानसेनाचे गाण्याचा बेत केला. आणि बादशहास गायन ऐकण्यास तेथें आणिलें. दहापांच हजार मंडळीचा था-

ट बसला असतां तानसेनानें गायनास आरंभ के-
ला. प्रथमतः दीपकल्याणराग गातांच एकदम ए-
काएकीं संपूर्ण दीप प्रज्वलित होऊन मोठा भव्य प्रका-
श कचेरीत पडला. तें पाहून बादशाहास अत्यंत वि-
स्मय वाटून आनंद झाला. नंतर तानसेनानें संपूर्ण
राग रागिणी सर्वोत्कृष्ट गावून बादशाहाचें मनरंज-
न करून संतोषित करिता झाला तें गायन पुरें झा-
ल्यावर निकटवासी सेवक आणि मोठमोठे मुत्सद्दी
व सरदार उमराव बादशाहास अर्ज करिते झाले.
तानसेनाचा गुण बिरबलाचे सर्व गुणापेक्षां अधि-
क आहे किंवा कसें हें प्रत्यक्ष खावंदांचे नजरेस आ-
तां आलेंच असेल याजकरितां तानसेन यास बिर-
बलाची पदवी मिळावी. असें सर्व लोकांचें भाषण ऐ-
कून बादशहा म्हणाला कितीही गुणवान् झाले त-
री बिरबलाचे गुणाखालीं आहेत. आतां तुमचा आ-
ग्रह आहेच तर याची प्रचिती तुमचे अनुभवास आ-
णून दाखवितो याप्रमाणें बोलणें होऊन कचेरी बर-
खास्त झाली. नंतर दुसरे दिवशीं अकब्बरानें ब्रह्मी-

देशाचा अबदुल्ला नामें बादशहा यास पत्र लिहिलें-
कीं, बिरबल आणि तानसेन या दोघांस तुह्मांकडे पा-
ठविलें आहेत तर पत्रदर्शनीं या उभयतांचा शिरच्छे-
द करावा. असें पत्रांत लिहून लखोटा करून त्याजव-
र आपली मोहोर केली. आणि तानसेन व बिरबल-
या दोघांस बोलावून आणून पत्र त्यांचे स्वाधीन के-
लें आणि सांगितलें कीं, ब्रह्मी देशचे बादशाहाकडे कां-
हीं काम आहे तें तुह्मीं उभयतां गेल्याशिवाय व्हावया-
चें नाहीं यास्तव फार जरूरीनें गेलें पाहिजे असा हु
कूम करून उत्तर घेऊन यावें म्हणून सांगितलें आ
णि उभयतांस रवाना केलें.

तानसेन आणि बिरबल उभयतां अकब्बरा
ची आज्ञा घेऊन ब्रह्मी देशाचे बादशहाकडे जाऊ-
न कचेरी भरली असतां अबदुल्लास वंदन करून
आपले बादशहाचें पत्र दिलें तें तत्काळ त्यानें वाचू-
न पाहिलें. त्यांत मजकूर कीं, पत्रदर्शनीं दोन असा-
मी पाठविले आहेत यांचा शिरच्छेद करावा. असा म-
जकूर पाहून तत्क्षणींच अबदुल्ला बादशहानें आप-

ले सेवकांस हुकूम केला कीं, शहरा बाहेर या उभ-
यतांस नेऊन यांचा शिरच्छेद करावा. याप्रमाणें हुकू
म होतांच सेवकांनीं बिरबल आणि तानसेन या दो-
घांस पुढें घालून चालविलें तेव्हां तानसेन अत्यंत
घाबरा होऊन रूदन करूं लागला. तेसमयीं बिरब-
ल त्यास म्हणाला. रडून काय उपयोग होणार तूं गु-
णार्जन मजपेक्षां वरिष्ठ आहेस असें तुझे सर्व ज्ञा-
तीचे लोक म्हणत असतात यास्तव आपले गुणाचे
प्रकाशानें हें संकट निरसावें त्याकाळीं तानसेन म्ह-
णाला मी तुला शरण आहें तुझे गूण अबाधित अ-
सून तूं परोपकारा विषयीं निरत आहेस. यास्तव-
माझी उपहास्यता नकरितां सत्वर प्राण वांचविण्या
ची युक्ती काढून संकटांतून पार पाडण्याची तज-
वीज करावी. याप्रमाणें तानसेनाचें भाषण ऐकून बि-
रबलानें युक्ती योजून त्यास म्हणता झाला. आतां-
भयसोडून धैर्यावलंबन करून मी सांगतों त्याप्रमा-
णें करावें. म्हणजे संकट दूर होण्यास अवघड नाहीं.
असें ऐकून तानसेनास कांहींसा भरंवसा वाटून म्ह-

णाला तूं सांगशील त्याप्रमाणें करिनों. बिरबल म्ह-
णाला डोकें मारण्याचे ठिकाणीं आपल्यास नेलें म्ह-
णजे मजला मागेंसारून तूं पुढें होऊन माझ्या अगो-
दर शिरच्छेद करावा असें बोल. तसाच मीही तुला
मागें सारून माझा शिरच्छेद अगोदर करावा. असें
म्हणत जाईन असें एकमेकांचें पुढें आग्रह पूर्वक-
निर्भय युक्त आणि खेद रहित हस्तमुख असा भा
व दाखवून आनंदानें एकमेकांस मागेंसारून अगो
दर माझा शिरच्छेद करावा इतकेंच बोलत जावें. या
पुढें काय बोलणें तें मी बोलेन. या प्रमाणें मार्गानें जा-
त असतां विचार ठरून शहरा बाहेर आले तेव्हां.
राजसेवकांनीं शिरच्छेद करण्याची तयारी करून ते-
थें उभयतांस नेलें त्यासमयीं बिरबल पुढें उभा राहि-
ला तेव्हां तानसेनानें त्यास मागें सारून आपण पुढें
झाला. आणि म्हणूं लागला कीं, अगोदर माझा शिर-
च्छेद करा असें तो म्हणत आहे तों बिरबलानें त्यास
मागें सारून तोही तसेंच म्हणो लागला. असे एका-
पुढें एक होऊन जो तो म्हणतो माझा शिरच्छेद अगो-

दूर करा असें त्या उभयतांचें भांडण पाहून राजसेव-कांस मोठें आश्चर्य वाटून म्हणतात काय हो हे केवळ अज्ञानी आहेत यांचा प्राणांत आला असून किंचि-त् ही खेद न करितां आनंदानें एकापुढें एक अगोदर मरणासाठीं भांडत आहेत असें तें विस्मय कारक त्यां-चें कृत्य पाहून सेवकांनीं विचार केला कीं, ही गोष्ट बा-दशहास निवेदन करून नंतर हुकूम होईल त्याप्रमाणें क-रावें असा विचार योजून बादशहास तो चमत्कार येऊन सांगितला; तेव्हां अबदुल्लानें त्या उभयतांस आपले समोर आणून विचारिता झाला कीं, तुह्मी मोठ्या आ-नंदानें एकापुढें एक मरण्यास उदार आहां याचें का-रण काय? तें सांगावें तेव्हां बिरबल म्हणाला याचें कार-ण तुम्हीं पुसूं नये व आह्मीं सांगूं नये असेंच आहे. बा-दशहा म्हणाला याचें कारण सांगितलें पाहिजेच बि-रबल ह्मणाला या गोष्टीचे भरीस आपण पडूं नये आ-मचा शिरच्छेद लवकर करावा. आपल्या आग्रहास्त-व आह्मीं सांगितलें असतां आमचें फार नुकसान हो-णार आहे यास्तव आह्मांस भिडेस घालूं नये असें

ऐकून बादशहास तें कारण कळण्या विषयीं फारच उत्कंठा लागत चालली. आणि त्यास पुनः आग्रहानें विचारिता झाला. तेव्हां बिरबल म्हणाला कारण सांगण्यापासून आमचें नुकसान आणि अकब्बराचे मसलतीस व्यत्यय येऊन आह्माकडे मोठा गुन्हा येईल या स्तव खावंदांनीं कारण न पुसतां अतीसत्वर आमचा शिरच्छेद केला पाहिजे. कारण गुप्त ठेवीत चालल्यामुळें बादशहास तें कळण्याची अधिक आशा वाढत जावी यास्तव बिरबलानें बळेंच लांबणीवर लावून सांगण्याचें आटून धरिलें आणि लवकर शिरच्छेद करावा. म्हणून निकड लाविली. तेव्हां बादशहा म्हणाला असें तुमचें गुप्त कारण काय आहे तें समजल्याशिवाय शिरच्छेद करणें नाहीं. तेव्हां बिरबल म्हणाला आह्मीं शिरच्छेद करण्या विषयीं इतका आग्रह करितों आणि बादशहानें तुह्मांकडे शिरच्छेद करण्यास्तव आह्मास पाठविले याजवरून कांहीं तरी यांत मोठें कारण असावें असें तुमचे ध्यानांत पहिल्यानेंच कसें आलें नाहीं. आमचा शिरच्छेद काय अकब्बरास करतां येत नव्हता? परंतु

तुह्मांकडेच मुद्दाम पाठविलें तें कारणावांचून पाठवि लें नसेल. बादशहा म्हणाला तूं जें बोलतोस हें खरें दिसत आहे आतां माझेही ध्यानांत आलें यास्तव जें कारण असेल तें आतां गुप्त न ठेवितां प्रगट करावें बिरबल म्हणाला तुमचे आग्रहापुढें इलाज नाहीं यास्तव सांगणें प्राप्त परंतु सांगितल्यावर तरि आमचा शिरच्छेद केला पाहिजे असें बुद्ध्या आग्रहानें बोलणें लबाडीनें लावून ठेवून आह्मीं सांगितलें असें अकब्बरास न कळण्याची तजवीज असावी असें बोलून सांगता झाला. तुमचे राज्याची मसलत बहूतदिवस अकब्बर करीत आहे परंतु तुमचा पराक्रम मोठा तुह्मांजवळ लढाई करून परिणाम नाहीं आणि तुमचें राज्यतर हस्तगत व्हावें अशी इच्छा फार असून तें आजपर्यंत घडलें नाहीं परंतु सांप्रत एक अवलीया फकीर सर्व जगांत श्रेष्ठ केवळईश्वर मूर्ती ज्याचे मुखांतून वाणी निघते ती तात्काळ फलद्रूप होते असातो महा श्रेष्ठ असून त्यास अकब्बरानें गुरू केला आहे त्याजपाशीं त्यानें अर्ज केला कीं, ब्रह्मी देशचें

राज्य माझे अमलांत येण्याची नजवीज झाली पाहिजे त्याजवरून अवलीया साधूनें सांगितलें कीं, जो पुण्यवान् प्रतापी आहे त्याचें राज्य नष्ट होणें नाहीं; परंतु त्याचे हातून निरापराधी दोन मनुष्यांचा शिरच्छेद होईल तर तो त्या पातकास लिप्त होऊन लागलाच मृत्यु पावेल. आणि मनुष्यांचा शिरच्छेद होईल त्यांतून पहिला अबदुल्लाचे गादीवर राजा होईल आणि मागून ज्याचा शिरच्छेद होईल तो प्रधान असा त्या पुरुषानें भविष्यार्थ सांगितल्यावरून आह्मीं अकब्बराचे परम प्रिय आहोंत याजकरितां तो लाभ आह्मांस मिळावा यास्तव आमचे शिरच्छेदनाची योजना करून तुह्मांकडे पाठविलें आहे आम्ही गादीचे मालक झालों तरीं अकब्बरासच मिळाल्या सारखें आहे असें जाणून आपले आणि आमचे हिताची इच्छा धरून तुह्मांकडे पाठविलें आहे आतां विलंब न करितां पूर्वी माझा शिरच्छेद करावा. या प्रकारें ऐकून अबदुल्ला म्हणाला अशी गोष्ट आहे तर तुमचा शिरच्छेद करण्यास कसें प्रवर्तक व्हावें विष समजून विषा-

ची प्रचीती कोणी पाहील काय? अकब्बराचा हुकूम मी मानिला नाहीं तर तो काय करणार आहे तुह्मीं आलेत तसे परत जावें बिरबल म्हणाला एवढ्या साठीं च मी सांगत नव्हतों आतां आमचा केवढा घात आणि नुकसान आपण योजिलें पहा तर असें न करितां अकब्बराचे हुकुमास मान्य करावें बादशहा म्हणाला माझे एका लहानशा वजिराची योग्यता अकब्बरास नाहीं असें असून आह्मांवर तो हुकूम करितो ह्याचा केवढा मूर्खपणा आहे यास्तव त्याचा हुकूम आह्मीं मानीत नाहीं आणि तुमचा शिरच्छेद ही करीत नाहीं. बिरबल म्हणाला खावंद आपण रागास नयावें आपले युक्तीस न येईल तर आह्मीं काय करावें अकब्बराच्यानें ही तरी काय होणार. यास्तव आतां मेहेरबानी करून पत्राचा जबाब देण्याची परवानगी झाली पाहिजे असें अबदुल्लानें ऐकून तात्काळ जबाब लिहून दिला कीं, तुह्मीं पत्रीं लिहिलेलें काम आह्मांस करण्याची जरूर नाहीं असें पत्रीं लिहून खलिता करून दिला तो घेऊन बिरबल आणि तानसे-

न उभयतां दिल्ली शहरास येऊन अकब्बरास भेटून पत्राचा जबाब आणिलेला दिला तो त्यानें पाहून तानसेन यास विचारिता झाला कीं, तुह्मी जिवंत कसे आलेत तेव्हां झालेला मजकूर सर्व तानसेनानें सांगून ह्मणाला कीं, बिरबलाचे अकले विषयीं धन्य आहे त्याचे चातुर्यानें आज वांचून आलों याप्रमाणें ऐकून बादशहा आपले ज्ञातीय लोकांस ह्मणाला कीं, तुम्हांस मी सांगितलें तें खरें आहे किंवा कसें हें तानसेनानें च सांगितल्यावरून प्रत्ययास आलें असेल.

## गोष्ट ७८वी.

## अकब्बर भारता विषयीं.

एके दिवशीं बिरबलास बादशहा बोलला कीं, पूर्वींचे युगांत जे राजे झाले त्यांचे कीर्तीचीं पुराणें झालीं पांडवांचे प्रतापाचें भारत झालें तसें माझे पराक्रमाचें आणि कीर्तीचें अकब्बर भारत होईल किंवा नाहीं. याप्रकारें त्याचें बोलणें ऐकून बिरबल ह्मणाला अकब्बर भारत होण्यास अवघड नाहीं आणि संकट ही नाहीं परंतु सवालक्ष भारत आहे तेवढें होण्यास

सवालक्ष रुपये पाहिजेत ते देण्याची परवानगी होईल तर सहामहिन्यांत ग्रंथ तयार होईल याप्रमाणें ऐकून बादशहानें तात्काळ सवा लक्ष रुपये दिले. तंतर बिरबलानें ते रुपये आणून त्याचा सद्व्यय केला. आणि ग्रंथाचें काम तसेंच राहून गेलें. सहामहिने भरत आले तेव्हां एके दिवशीं बादशहा म्हणाला अबे बिरबल हमारा ग्रंथ तयार हुवाके नहिं बिरबल म्हणाला खुदावंत पुरा होनेको थोडाबखत है त्याउपरांत बिरबलानें पांचचार दस्ते कोरे कागद कापून पुस्तकाचे फर्म्या प्रमाणें तयार केले आणि खालीं वर चांगल्या सुंदर लांकडाच्या फळ्या घालून चांगले उंची कापडाचीं सात आठ वेष्टणें गुंडाळून रेशमाचा जरतारी दाल पुष्कळसा लांब भोवताला वेष्टून तें पुस्तक स्वतः बगलेंत घेऊन बादशहाकडे आला त्यास पाहून बादशाहा म्हणाला क्यों बिरबल अबे ग्रंथ तयार हुवा है क्या बिरबल म्हणाला खुदावंत पहा सर्व तयार झाला आहे असें बोलून पुस्तक सोडावयास लागला एकेक वेष्ट

ण सावकाशीनें सोडीन सोडीन म्हणाला ग्रंथ पूर्ण होण्यास थोडी अडचण आली आहे तिचा निकाल राणी साहेबां कडून झाला पाहिजे यास्तव परवानगी होईल तर त्यांस विचारून येतों. बादशाहानें ग्रंथ झाला आहे असें वेष्टणें सोडीन असल्यामुळें जाणून म्हणाला राणीकों क्या पूछने का होयगा सो पूछले असें ऐकतांच बिरबलानें पुनः त्या ग्रंथाचीं वेष्टणें बांधून ग्रंथ लिहिलेला किंवा कोरे कागद हें दृष्टीस पडूं न देतां ग्रंथ बांधून घेऊन राणी साहेबांकडे गेला आणि अकब्बर भारत करण्याविषयीं बादशाहाचा हुकूम झालेला मजकूर तिजला सर्व समजावून बोलता झाला कीं, सर्व ग्रंथ तयार करून आणिला आहे हा पहावा. परंतु थोडकी अडचण आहे त्यामुळें नड राहिली आहे ती आपल्यांकडून निघाली पाहिजे यास्तव बादशहा यांचा हुकूम झाल्यावरून आपल्या कडे आलों आहें आपळी बोलण्या विषयीं परवानगी होईल तर आणि आपल्यास क्रोध न येईल तर बोलतों असें ऐकून राणी म्हणा-

ली काय विचारणें असेल तें बोल. याप्रमाणें हुकूम झा-
ला तेव्हां बिरबल म्हणाला पांडवांची स्त्री द्रौपदी ति-
चे पंच भ्रतार पांच पांडव होते तसे आपले पांच कोण
पाते हें मला माहीत नाहीं. एक बादशाहा मात्र माहीत
आहे आणखी चार कोणते त्यांचीं नांवें कळविलीं पा-
हिजेत. म्हणजे ग्रंथ शेवटास जाईल. असें ऐकतांच
राणीस मोठा क्रोध येऊन बिरबलास दुर्भाषणें बोलू-
न म्हणाली. ही नसती फजीती विनाकारण बुध्या क-
रून घेण्याचें ज्ञान तुला आणि खावंदांस कोणी मू-
र्खानें सांगितलें असेल तें असो हा तुझा ग्रंथ जाळू-
न टाकण्यास योग्य आहे असें बोलून तो ग्रंथ बळें-
च घेऊन जाळून टाकिला. तेव्हां बिरबल मनांत हर्ष
पावून द्रव्य जिरविण्याचे संपादणी स्तव तेथून येऊन
बादशहास झालेला मजकूर समजाविता झाला-
त्यास उपाय नाहीं परंतु खरोखर म्हटलें असतां रा-
णी साहेब यांस खावंदाव्यतिरिक्त पुरुष मात्र पिता,
भ्रत भ्राता तठूत आहेत हें सत्य असल्या मुळें त्यां-
स क्रोध आला हें ही खरें आहे असें ही बोलून म्ह-

णाला राणी साहेब यानीं ग्रंथाचा नाश केला आ-
तां कसें करावें एवढी दुस्तर मेहेनत आणि सवालक्ष-
रुपये ही व्यर्थ गेले या गोष्टीस माझा इलाज नाहीं द्रौ
पदी साररवे पंचभ्रतार राणी साहेब यांस आणि
पुनः पैसा रवर्च करण्याचें रवावंद करूं शकतील तर
आणरवी उद्योग करून मेहेनत घेऊन ग्रंथ सत्वर त-
यार करण्याचें काम पुनः चालवीन याप्रमाणें ऐकू-
न बादशहा म्हणाला बिरबल ऐसी हरकत है तो फेर
ग्रंथ करने की जरूर नहिं पैसा रवरच हुवासो हुवा कु-
च फिकीर नहिं याप्रकारें बिरबलानें ऐकून बरें आहे
रवावंदांची मर्जी असें म्हणून कृतकार्य होत्साता जा
ता जाहला.

## गोष्ट २९ वी.

## ब्राह्मणाचे आंगाच्या विषयीं.

एके दिवशीं बादशहा कचेरीस बसला असतां ते-
थें बिरबल नसोन एक फकीर बादशहाकडे आला, त्यानें
एका पानावर धनें आणि सब्जा असे दोन जिन्नस बाद-
शहास नजर केले त्याच संधीस एक तुळजापूरचा ब्रा-

ह्मण तेथें आला त्यानें एकाकागदांत आशीर्वादार्थ कुंकुम सहित अक्षता आणि देवीचा आंगारा याप्रमाणें बादशाहा पुढें ठेवून कांहीं द्रव्य लाभ व्हावा या हेतूनें उभा राहिला. अशा त्या दोघांहीजणास बादशाहानें पाहून प्रथमतः ब्राह्मणानें पुढें ठेविलेले पदार्थ अवलोकन करून मिरधेस विचारिता झाला कीं, हे पदार्थ काय आहेत तेव्हां त्यानें सांगितलें चावल और खाक है असें ऐकून बादशाहा म्हणाला ये बम्हनने हमारी गादी खाक होने कें वास्ते खाक लाई है क्या असा अर्थ समजून त्यास धक्के देऊन बाहेर घालविण्या विषयीं हुकूम करिता झाला त्याजवरून मिर्धेनें ब्राह्मणास गचांड्या देऊन बाहेर घालविला नंतर बादशाहानें विचारिलें कीं, फकीरानें काय पदार्थ नजर केला आहे तेव्हां मिरधेनें सांगितलें धने और सबुजा लाया है असें ऐकून सबजा प्रियवस्तु जाणून त्यास शंभर रुपये बक्षीस देण्याचा हुकूम करिता झाला. तों इतक्यांत बिरबल कचेरीस येत असतां तुळजापूरचा ब्राह्मण बाहेर भेटला त्यानें रुदन करीत आपली हकीकत त्या-

स सांगितली ती ऐकून त्या ब्राह्मणास न हकूब असण्या विषयीं सांगून बिरबल कचेरीस आला. तों फकीर याचें ही वर्तमान समजलें नंतर बादशाहास भेटून म्हणाला कीं, खावंदांनीं गोष्ट चांगली केली नाहीं, तुळजापूरचे भवानीचा पुजारी ब्राह्मण महा विद्वान सत्पुरुष येथें आला होता त्याचा अपमान खावंदांनीं केला हें नीट झालें नाहीं. ज्याणे खावंदांची गादी सलामत- आबाद चांगली रहावी म्हणून भवानीचा प्रसाद दिला त्यासच गचांड्या दिल्या ही खावंदांची अपकीर्ती परमुलखांत ही मोठी होईल. आणि ज्यानें खावंदांचें मोठें नुकसान होण्याचे अर्थानीं नजर केली त्यास इनाम देण्यांत आलें हें आश्चर्य आहे, असें बिरबलाचें भाषण ऐकून बादशहा म्हणाला ब्राह्मणानें खाक आणि चावल नजर केली. त्याचा अर्थ असा झाला कीं, हमारी गादी खाक हो जायगी उस्से वास्ते उसकों हकाल दिया. फकीरनें देखो कैसा अच्छा सबजा हमारे मीन की चीज लाई उस्से वास्ते उसको इनाम दिया असें ऐकून बिरबल चातुर्यानें त्यांना अर्थ फिरवून

सांगता झाला कीं, ब्राह्मणानें भवानीचा आंगारा म्हणजे ज्यास राख असें म्हणतात ती राख आणि आशिर्वादार्थ अक्षता तांदूळ म्हणजे चोखा असे दोन जिन्नस आपल्यास नजर केले. त्यांतील अर्थ असा कीं, खावंदांची गादी चोखा म्हणजे चांगली राख म्हणजे रक्षण कर असा अल्लाजागीं अर्ज करून भगवती भवानीचा प्रसाद खावंदांस ब्राह्मणानें दिला असा कल्याण चिंतणारा त्यास धक्के मिळाले आणि फकीरानें धनें व सबजा दोन जिनसा दिल्या त्याचा अर्थ असा होतो कीं, धनें म्हणजे द्रव्य, गोधनें इत्यादि सर्व धनें सबजा म्हणजे संपूर्ण जावंन. असें खावंदांचें नुकसान होण्याची इच्छा धरून दोन चीजा दिल्या त्यास इनाम मिळालें हीं दोन्हीं कामें बरोबर झालीं किंवा कसें हें मनांत पहावें याप्रमाणें बिरबलाचें भाषण ऐकून बादशहा म्हणाला तूनें कहिये सो बात सच्ची है हमनें अब दिलमे पच्छानें उस्से वास्ते अब फकीर को हकाल देना और बम्हनको दोसो रुपये देना याप्रमाणें बोलून तात्काळ दोनशें रुपये त्या ब्राह्मणास कचेरींत आणून दिले

आणि फकीर यास कांहीं न देतां कचेरींतून काढून दिला. याप्रकारें बिरबलानें चातुर्थेनेतें ब्राह्मणाचें कार्य करून दिलें.

## गोष्ट ३०वी.

## सत सोंई परमान चय्ये.

बादशहानें दिवाणगिरी आणि न्यायाधिशी तसेच राजकीय आदीकरून मोठमोठीं कामें बिरबलाकडे नेमिलीं होतीं त्यांतून न्यायाधिशीचें काम कांहीं दिवस स्वतः त्यानें चालविलें होतें परंतु ज्याज्या खटल्याचा निकाल होऊन अखेरीस हुकूम फर्माविला जात असे तो बिरबलास कळवून बादशहा म्हणत असे कीं, सुनो बिरबल ये निवाडा कैसा सत् हुवा देखो असें प्रत्यहीं म्हणत असे त्या त्या वेळेस बिरबलही जबाब देत असे कीं, सत् सोंई परमान चय्ये. असा हरवक्त जबाब देत असे तेणें करून बादशहाचें मन प्रशस्त नसोन कांहींसे रुष्ट होतें याप्रकारें कांहीं दिवस लोटले असतां एके दिवशीं असा चमत्कार झाला कीं, बादशहाचे रंगमहालांतील बिछाना घालण्याचें काम प्रत्यहीं रसूल खोजा यांजकडे होतें तो नित्या प्रमाणें तें काम करीत असतां एक-

दिवस त्या बिछान्यावर बादशहा निजला असतां स्वस्थ निद्रा लागली नाहीं यामुळें रसूल खोजा यास बादशहा क्रोधानें बहून प्रकारें बोलला कीं, बिछाना घालते समयीं तूं ढेंकूण पिसा केर कचरा नीट पहात नसल्या मुळें निद्रा चांगली लागली नाहीं. अतःपर असें होईल तर तुला शिक्षा केली जाईल. याप्रमाणें दरडावून ताकीद दिली. नंतर दुसरे दिवशीं त्या रसुलानें बिछाना दिवसास तापवून रात्रीं नीट झाडून झटकून मंचकावर घालून तयार केला आणि मनांत असें आणिलें कीं, बादशहास अशा निर्मळ बिछान्यावर झोंप लागत नाहीं याजला काय ढसनें किंवा रुतनें याचा अनुभव स्वतः क्षणभर घ्यावा आणि झोंप नये ण्याचें कांहीं कारण आढळल्यास तें दुरुस्त करावें असा विचार मनांत आणून मंचकावरील बिछान्यावर निजला आणि सर्वांगावरून पांघरूण घेतलें तों त्याचे शत जन्मांत ही तसा बिछाना निद्रा करण्यास सांपडला नव्हता यामुळें अत्यंत गाढ निद्रा लागून गेली.

बादशहा नित्या प्रमाणें दहा घटिका रात्रीस रंगम-

हालांत निजण्यास जावयाचा परंतु त्यादिवशीं कांहीं राजकीय काम मसलतीचें होतें यास्तव बिरबल आणि बादशाहा एकांतीं मसलत करीत बसले असतां मध्यरात्र होऊन गेली. इकडे राणी साहेब पाकशाळेचे मंदिरांत दहा घटिका रात्र पर्यंत असून नंतर मत्सहीचें सांप्रदायानुरूप दहा घटिका होऊन गेल्या दोन घटिकांनीं म्हणजे बारा घटिका रात्रीचे सुमारें रंगमहालांत निघून गेली. तों मंचकीं बिछान्यावर बादशाहाच निजला आहे असें समजून त्यास जागृत न करितां आपले आंगावरील शाल पायघोळ आणि तोंडावरून पांघरून स्वस्थ निद्रागत झाली. त्या समयीं हिपरा नामक एक दासी होती तिचें आणि राणीचें कांहीं कारणावरून वैमनस्य होतें तिनें पाहून मनांत संशय आणिला कीं, बादशाहा एकांतीं मसलतीस बसले आहेत ते अद्याप उठले नाहींत आणि रंगमहालांत तर राणी साहेब आणि दुसरें मनुष्य अशीं दोघें निजलीं आहेत तस्मात् कोणीतरी जारपुरुष मंचकावर घेऊन राणी निजली आहे असें त्या दासीनें मनांत सिद्ध करू-

न तात्काळ जेथें बादशहा आणि बिरबल बसले हो- ते तेथें समीप येऊन बोलली कीं, मजला खावंदांपाशीं फारच जरूरीनें कांहीं बोलणें आहे. याकरितां मसलतीचें काम महकूब ठेवून माझा मजकूर ऐकिला पाहिजे असें निग्रहाचें बोलणें ऐकून बादशहा तेथून बाहेर येऊन तिजला विचारिता झाला. तेव्हां ती हिपरा दासी सांगूं लागली कीं, खुदावंत तकसीर माफ होना सुनो खावंद के राणीसाब कोई जारकों लेके रंगमहाल मो सो रही हैं झूट है के सच्चा है सो अबी हाल मेहलमें जाकर देखना या प्रमाणें बादशहानें ऐकतांच अत्यंत क्रोधायमान झाला, आणि बिरबलास मजकूर कळविला, तेव्हां तो म्हणाला खावंद, सुनो- सत् सोंई परमान चख्खे- असें ऐकून तर क्रोधाची फारच वृद्धी होऊन तात्काळ बादशहा तेथून उठून मोठ्या त्वरेनें रंगमहालांत जाऊन गुप्तपणानें पहाता झाला. तों हिपरा दासीनें सांगितल्या प्रमाणें प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिलें त्यासमयीं राणी विषयीं तर क्रोध- अतिशयच आला कीं. या वेळेस आपले हातानें इचा

शिरच्छेद करावा. असा क्रोध आला आहे ऐसें बि-
रबलानें जबाब केला त्याचा अधिक क्रोध येऊन मनां
न विचार केला कीं, मी न्यायाचें काम यथार्थ करीत-
असतां ही हरवक्त बिरबल जबाब करितो "सत् सो-
ई परमान चय्ये" असें म्हणत असोन सांप्रत दासीनें
सांगितलें त्यास ही तसाच जबाब करितो त्यास अ-
गोदर बिरबल यास खोटा करून त्याचें पारिपत्य
केलें पाहिजे. नंतर राणीचें पारिपत्य करण्यास उशी-
र काय असें मनांत आणून पुनः तसाच माघारा फि-
रून बिरबलास बोलला कीं, दासीनें सांगितल्याप्र-
माणें मी प्रत्यक्ष दृष्टीनें पाहून आलों तेव्हां बिरब-
ल पुनः तसाच जबाब करिता झाला तेव्हां बादशा-
हा क्रोधाविष्ट होऊन त्यास म्हणाला बिरबल सुनो
हम् आपने आखोंसे हाल ओबे देखे सोई सत नहीं-
तो क्या हम् झूटे कहने अब् उसको और परमान क्या
चय्ये. तुमको सत परमान चय्ये तो उठो अबन्धर च-
लो अब्बी तुमको दिखाने असें बोलून त्यास हातीं ध-
रून गुप्तपणें रंगमहालांत आणिला आणि राणी-

शेजारीं पुरुष असून उभयतां मंचकावर निजलीं आहेत. असें प्रत्यक्ष दाखविलें तें पाहून पुनः ही बिरबल तसेंच मनसोई परमान चव्ये असें म्हणतांच बादशहास असा क्रोध आला कीं, हा राणीचा मिलाफीच असेल यास्तव असें बोलतो. तर यांचे प्राणाचा घोटच घ्यावा असा अतिशय क्रोध आला ते लक्षणपाहून बिरबल म्हणाला खुदावंत माझा जाब आहे तो सत्य आहे आपण प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिलें म्हणून सत्य मानीत आहांत परंतू याचें प्रमाण पाहिल्यावर सत्य किंवा असत्य हें कळून येईल या प्रकारें बोलून पुनः सांगता झाला कीं, राणीसाहेब पतिव्रता आहेत त्यांचे हातून दुष्कर्माची गोष्ट घडावयाची नाहीं अशी माझी निश्चयात्मक खात्री आहे याजकरितां खावंदांनीं क्रोध सोडून प्रचीती पहावी. या रंगमहालाचे द्वारा पाठीमागें आपण गुप्तपणें उभें रहावें आणि मी तों कशी करितों तीं भाषणें श्रवण करावीं आणि जें होईल तें दृष्टीनें पहावें म्हणजे काय प्रमाण तें खावंदांस दिसून येईल. या प्रमाणें सांगून बादशहास दरवा-

जाचे आड ठेविलें आणि बिरबल मंचका जवळ जावून राणीचे मुखावरील वस्त्र काढिता झाला. त्यासमयीं दचकून चावळन बरळन कांहीं झोपेंत असी असून बोलली कीं, खावंद सा यहां उस्से वास्ते हमने जगे नहिं किये असी बरळन उठोन जागृत होऊन पहाते तों बिरबल दृष्टीस पडला तेव्हां लज्जायमान हो-त्साती मंचका वरून उठून दरवाजा समीप उभी राहि-ली. बादशाहा दारामागें समीपच असोन बिरबल राणीस विचारतो कीं, मंचकावर कोण आहे राणी म्हणाली खावंद बादशाहा आहेत बिरबल म्हणा-ला महालांत निजावयास केव्हां किती घटिका रात्री-स आले त्यांची झोंप पुरती झाली असेल किंवा ना-हीं फार जरूरीचें काम आहे सबब त्यांस उठविलें पाहिजे याज करितां मजलाच येथें येणें प्राप्त झालें याप्रमाणें पोटांतील मजकूर समजों न देतां यथायु-क्त संपादणीचें बोलणें बोलला तेव्हां राणी म्हणा-ली आज नित्या पेक्षां अगोदरच केव्हां येऊन निज-ले होते तें मला माहीत नाहीं मी नित्याप्रमाणें आ-

लें तों खावंदांस निद्रा लागली होती यास्तव त्यांस जागृत न करितां तसीच त्यांचे समीप निजलें.असें तिचें बोलणें झाल्यावर तिजला सांगितलें कीं, त्वां पाकशाळेंत जावें मजला खावंदां जवळ कांहीं मसलत करणें आहे असें सांगून तिजला तेथून लावून दिली इतका सर्व मजकूर बादशहानें ऐकला तंतर जो पुरुष निजला होता त्यास बिरबलानें जागृत केला तेव्हां तो ही दचकून बरळत उठला कीं, बिच्छाना अच्छा हुवा है अच्छा हूवाहै असें बरळत उठला आणि बिरबलास पाहून भयाभीत होत्साता थरथरां कांपूं लागला. त्यास बिरबलानें हातीं धरून विचारिलें कीं, तुझे शेजारीं कोण निजलें होतें आणि तूं येथें निजण्याचें कारण काय? तेव्हां रसूल खोजा म्हणाला सत्य सांगतों या बिच्छान्यावर काल रोजीं बादशहास निद्रा स्वस्थ लागली नाहीं त्यामुळें मजवर फार रागास आले याज करितां आज बिछाना चांगला वाळवून टेंकूण पिसवा केर कचरा दुरुस्त करून बिच्छाना झाडून झटकून चांगला घातला आणि बादशहास झोपस्वस्थ येण्या-

स कोठें कांहीं कसर राहिली आहे कीं काय? हें पहा-
ण्या करितां मी मूर्खपणानें क्षणभर त्याजवर निजलों
तों गाढ झोंप लागून गेली. त्यावर ही वेळ पर्यंत येथें
कोणी आलें किंवा गेलें हें मजला कांहीं माहीत नाहीं.
दिवे लागले तेव्हां बिछाना घातला त्यास दोन घटिका
झाल्या असतील मला लवकर भोजन करून आण
खी चाकरीवर हजीर होण्यास आलें पाहिजे याजक-
रितां मजला गुन्हा माफ करून लौकर सोडावें या प्रमा-
णें त्यानें सांगितलें "गाढनिद्रा लागल्यामुळें त्यास दो-
न प्रहरांच्या दोन घटिकाच वाटल्या" त्याचे बापजन्मीं
असा मऊ बिछाना कधीं ही आंगास लागला नव्ह-
ता त्यामुळें गाढनिद्रा लागली. हें बिरबलाचे आणि
बादशहाचे ही मनांत खचीतच भासून त्यास सोडून
दिला. नंतर बादशहास मंदिरांत आणून बिरबल
बोलला कीं, सत् मोर्ई परमान नच्ये हा माझा जबाब-
खरा आहे किंवा खोटा आहे हें खावंदांनीं दिलांत आ-
णावें या प्रमाणें त्याचें भाषण ऐकून बादशहा कुंठि-
त होत्साता मोठा आनंद पावून बिरबलाचे बहुत उप-

कार मानून त्यास शाबास शाबास म्हणून पुष्कळ द्रव्य आणि गांव इनाम देता झाला. राणी विषयीं निःसंशय मन होऊन म्हणाला कीं, बिरबलाचे योगानें आज मोठा अपघात टळला. स्त्रीहत्येचा दोष मजला घडला असता राणीचा पुनर्जन्म होऊन मजला स्त्री लाभ झाला. इत्यादि बिरबलाचे उपकार वारंवार स्मरता झाला.

## गोष्ट ३१ वी.

## सो शाहाणा अक्कल एक.

एके दिवशीं बिरबलास बादशाहा बोलला कीं, दुनिया मो सब लोकन का दील और अक्कल एक हॅ की न्यारी न्यारी है बिरबल म्हणाला. सर्वांची मती निर्निराळी आहे या विषयीं म्हटलें आहे:- "पिंडेपिंडे मतिर्भिन्ना" पिंडापिंडाची मती भिन्न भिन्न आहे, बादशाहा म्हणाला जसी मती निराळी तसीच सर्वशाहाण्याची अक्कल निरनिराळी होय बिरबल म्हणाला 'सो शाहाणा अक्कल एक' याचा मतलब ज्याचा त्यास समजण्याची अक्कल सर्वांची एकच असते

त्याची प्रचीती उदईक दारवबितों असें बोलून म्हणा ला कीं, आपल्या वाड्या पुढील पाण्याचा हौद आहे तो कोरडा केला पाहिजे आणि शहरांतील लोक या- नीं दरएक घरची एकेक घागर दुधानें भरून रात्रीचे रात्रींत त्या होदांत ओतण्या विषयीं शहरचे लोकां- स हुकूम झाला पाहिजे असें बादशहानें ऐकून त्याप्र- माणें सर्व लोकांस हुकूम फरमाविला आणि हौद को रडा करून त्याजवर पांढरे कापडानें आच्छादन - घालून हौदांत दूध जाण्यास जागजागीं पाट राखि ले होते नंतर त्या काळोख्या रात्रींत शहरांतील लो- कांनीं ज्याणे त्याणे आपले हितास्तव असा मनसु- ब केला कीं, हौद भरण्यास हजारों घागरी दूध लो- क आणून ओततील त्यांत आपली एक घागर पा- ण्याची भरून ओतिली तरीं बोभाट न होतां इत- क्या दुधांत संपादली जाण्यास हरकत नाहीं या- स्तव कोणाचे न कळत पाण्याची घागर नेऊन ओता- वी असा ज्यानें त्यानें विचार करून कोणास न सम जतां पाण्याचीच घागर भरून नेऊन हौदांत जा-

ण्या साठीं जागजागीं पाट केले होते त्यांत ओतूं ला-
गले. या प्रमाणें सर्वांनीही आपआपले मनलबास्त-
व पाण्याच्याच घागरी नेऊन ओतिल्या त्याची एकमे
कांची माहिती एकमेकांस नवती. हौदावर आच्छाद-
न असल्यामुळें त्यांत पाणी आहे किंवा दूध आहे.
हें कोणासही समजलें नाहीं आणि कित्येकांनीं दुरो
न पाहिलें तों पांढरे कापडानें आच्छादन असल्या
मुळें आंधारांत दुधासारखाच भास होत असे. उ-
परांत प्रातःकाळीं बिरबलानें बादशहास तेथें आ-
णिलें आणि त्याचे समक्ष हौदावरील आच्छादन का-
ढिलें तों हौदांत दुधाचा सपर्कही नसून सर्व हौद-
पाण्यानेंच भरलेला असा सर्व लोकांसह बादश-
हानें पाहिला तेव्हां बिरबल बादशहास म्हणाला
खुदावंत देखो:- सो शहाणा अक्कल एक. ये बात स-
ची हें क्या झूटी हें सो देखो याप्रमाणें बादशहानें
ऐकून त्याप्रकारेंच प्रत्यक्ष पाहून बिरबलाचें वचन स-
त्य मानिता झाला.

## गोष्ट ३२वी.

## बिरबलास बाटविण्या विषयी.

बिरबल जातीचा ब्राह्मण असून बादशहानें आपले जातीचे लोकांस सोडून त्यास दिवाणगिरीचें काम दिल्या मुळें संपूर्ण यवन लोक बादशहास शब्द लावून बिरबलाशीं हमेशा द्वेष करीत असत नें बादशहास कळलें होतें यास्तव बिरबलास हरएक तजविजीने अवचीत फसवून ज्ञाती भ्रष्ट करून आपले ज्ञातींत मिळविण्याचें करावें म्हणजे सर्वांचे चित्तानुरूप होऊन द्वेष ही नाहींसा होईल असें बादशहाचे मनांत फार दिवस असून कधीं कधीं असा विसर पडून त्यास म्हणत असे कीं, बिरबल हमारे घरकू नाष्टा करनेकू चलो असें त्यानें ऐकून त्या त्या समयीं हरएक तपसील लावून अडचण टाकून वरवत काढून घेत असें. एके दिवशीं बिरबल कांहीं कामाचे विचारांत आणि मननांत असोन त्यासमयीं बादशहा बोलला सुनो बिरबल सबेरे हमारे घरकूं तुम् खाना खानेको आव. असें बोलतांच बिरबलाचें चित्त व्यग्र असल्या मुळें त्याचें पुरतें लक्ष न पुरतां जबाब दिला कीं, अच्छा आऊंगा.

असें बोलून चुकला तें ऐकून बादशहास मोठा आनंद होऊन आपले ज्ञाती जन प्रमुख काजी आदीकरून लोकांस कळविता झाला आणि भोजनाचा समारंभ मोठ्या उत्साहें करून करण्याविषयीं हुकूम फर्माविला. नंतर यवन लोकांनीं भक्ष्य भोज्यादि चतुर्विध पदार्थ नाना जातीचे पशू श्वापदादिकांचीं मांसें तसेंच उत्तम मत्स्य आणि उत्तम मद्यादि उंची पदार्थ अनेक प्रकारचे करून दुसरे दिवशीं सर्व तयारी केली.

इकडे बिरबल मोठ्या विचारांत पडून चिंताग्रस्त झाला. बादशहा जवळ भोजनास येतों म्हणून अवचीत गैर समजुतीनें जबाब निघून गेला. आतां काय करावें! आजपर्यंत मिळविलेले कीर्तीची हानी होऊन ज्ञातिभ्रष्ट होण्याचा प्रसंग गुजरला त्यास इलाज कांहीं दिसत नाहीं. अशी अक्कल गुंग होऊन संकटांत पडून विचार करीत बसला आहे. तों बादशहानें भोजनाची तयारी करून तगाऱ्या मांडल्या. मोठे मोठे काजी मुलना फकीर सरदार उमराव तसेच सावकार इष्ट आप्त आदी करून सर्व यवन लोक पात्रांवर

बसल्यानंतर बादशहानें बिरबलास बोलावूं पाठ-
विलें त्याकाळीं निरुपाय जाणून बिरबल निघाला.
मार्गानें येत असतां एक सोनार मोत्यांचे दागिने ढुक-
राचे केंसाचे कुंचलीनें कुंचलीत बसला होता तें बिर-
बलानें पाहून त्यास तात्काळ युक्ती सुचली तेव्हां सो-
नार याजपासून ती कुंचली घेऊन भोजनाचा समारंभ
केलेल्या ठिकाणीं आला त्यास देखून बादशहा आदिक-
रून संपूर्ण यवन लोकांस विस्मय आणि आनंद अ-
तिशय होता झाला. त्या समयीं बिरबल म्हणाला.
मी भोजनास तर आलोंच आतां कांहीं अंदेशा राहि-
ला नाहीं परंतु आमचे सांप्रदायानुसार झालें पाहि-
जे इतकीच थोडीशी तड आहे त्या प्रमाणें माझे हातू-
न करण्या विषयीं परवानगी जहाली म्हणजे मी भो-
जनास सिद्ध आहें बादशहा म्हणाला तुझे रीतीनें अ-
सेल त्या प्रमाणें करावें बिरबल म्हणाला जितकीं पा-
त्रें वाढिलीं आहेत तीं सर्व उदकानें प्रोक्षण केलीं-
पाहिजेत. तसें केलें असतां कोणास क्रोध येईल
तर त्याचा बंदोबस्त खावंदांनीं ठेवला पाहिजे, बा-

दशहा म्हणाला तुझे सांप्रदायानुसार करण्यास आम
ची कांहीं हरकत नाहीं. तां बिनदिक्कत त्याप्रमाणें क-
रावें. या प्रकारें बोलणें सोडवून घेतलें नंतर हातां-
त पंजपात्री उदकानें भरलेली होती तेंच उदक कुंच-
लीनें सर्व पात्रांवर प्रोक्षण करीत चालला. तेव्हां ते डु-
कराचे केंस असल्यामुळें यवन लोकांस त्यानीं फार-
च अडचण जशी हिंदु लोकांस गायत्री तशीच यव-
न लोकांनी देवता डुकर याजकरितां डुकराचे संसर्गा
चा ही ते विटाळ मानितात. डुकराचें मांस, अस्थी र-
क्त चर्म केश इत्यादिकांचा संपर्क पोटांत गेला अस-
तां ते ज्ञातिभ्रष्ट होतात. यास्तव बिरबलानें केशोद-
कानें पात्रें प्रोक्षण केलीं तें पाहून बिरबलास शिव्या
गाळी देऊन लाथा बुक्या देण्याचा प्रसंग आणून सर्व
यवन लोकांनीं तेथून पिटवून काढिला. बादशहास क्रो-
ध आला परंतु तूं करशील त्यास आमची हरकत नाहीं
असा जबाब गेला होता त्यामुळें तो कुंठित होऊन बि-
रबलास तेथून बाहेर घालविता झाला. बिरबल म-
नांत म्हणाला दोन लाथा दिल्यातरी चिंता नाहीं परं-

तु भोजन करून वाटण्यानें संकट निवारण झालें इ-तकेंच फार मिळविलें असें मनांत आणून तेथून पळ काढून घरीं आला. इकडे बादशहानें रवाना केलेल्या सर्व वारला यास्तव टाकून देऊन दुसरे पदार्थ सिद्ध क-रून त्या सर्व लोकासह भोजन करिता झाला. पात्रें प्रो-क्षण करण्याची परवानगी बादशहानेंच दिली होती. यास्तव बिरबलास ही नाश झाल्या बद्दल शब्द ठेवण्या स जागा राहिली नाहीं याप्रमाणें बिरबलाचें चातुर्य होतें.

## गोष्ट ३३वी.

## बिरबलाचे गुरू विषयीं.

एका समयीं बादशहाचा गुरू बहुतां दिवशीं दि-ल्ली शहरांत आला त्या काळीं बादशहानें त्यास आपले घरीं आणून त्याचा आदर सत्कार करून मोठा उत्सा ह केला. पांच चार लक्ष रुपये देऊन मार्गस्त केला. नंतर बिरबलास म्हणाला तुमारा गुरू कोन है कहां रहाता है सो कहदे बिरबल म्हणाला माझे गुरू बहू-त आहेत, ते येथें रहात नाहींत परंतु त्यांतून एक गु-रू सांप्रत शहरांत आला आहे असें ऐकतों तो फार

निस्पृही आणि निरिच्छ असल्यामुळें माझे घरीं ही येत नाहीं त्याचा शोध करून खावंदास दर्शन देण्याचें त्यानें कबूल केल्यास येऊन समजावितो असें बोलून घरीं आला. नंतर रस्त्यांत एक मोळक्या दृष्टीस पडला त्यास बोलावून आणून मोळी ची किंमत त्यानें सांगितल्या प्रमाणें त्यास दिली. नंतर बिरबल त्यास म्हणाला हे गृहस्था चारघटिका पर्यंत मी सांगेन तसी वर्तणूक करशील तर पन्नास रुपये तुजला बक्षीस देईन. तुला साधूबनवून एके ठिकाणीं बसवितो तेथें तुझे भेटीस मोठमोठे श्रीमान् सरदार उमराव आणि बादशहा ही येईल त्यासमयीं किंचित ही भय मानू नको आणि कोणी कित्येक प्रकारें ही तुजला बोलण्या विषयीं यत्न केला तथापि एक शब्द किंवा एक अक्षर ही न बोलतां मौन धरून जपमाळेचे मणी ओढीत स्वस्थ बसावें. बादशहा तुज पुढें द्रव्याचा ढीग घालील तथापि त्यास हात न लावितां उगाच मौन्य धरून बसावें. या प्रमाणें चार घटिका किंवा एक प्रहर पर्यंत मी एक

हा तुजपाशीं येई तों पावेतों मुखावाटें अक्षर न काढितां एक्या जाग्यावर बसावें याप्रमाणें केलेंस म्हणजे पन्नास रुपये तुजला देईन आणि यांत अंतर पडल्यास तुझा शिरच्छेद करीन बादशहाची किंवा कोणाचीही हिमायत केलीसतरी उपयोग पडणार नाहीं अशी मोठी दहशत घालून त्याचे सर्वांगास राख लाविली आणि चन्हाटाची कोपीन व गोफणीची लंगोटी नेसवून वस्त्र किंवा बाडबिच्छाईत रहित एका मृगासनावर थोरशा मशीदींत आणून बसविला आणि हातीं स्मरणी देऊन मणी ओढीत बसण्यास सांगितलें. नंतर बादशहाजवळ बिरबलानें येऊन सांगितलें कीं, माझे गुरूनें आपल्यास दर्शन देण्याचें कबूल करून थोरले मशीदीचे डावे बाजूस बसले आहेत मजला आपले समागमें न येण्या विषयीं सांगितलें आहे याजकरितां खावंदांनीच तेथें जाऊन दर्शन घेऊन यावें तों पर्यंत मी येथेंच कचेरींत बसतों आलों असतां त्यांची मर्जी खप्पा होईल. त्यांस कोणाची पर्वा किंवा धनाशा मुळींच नाहीं ते निस्पृहीपणानें अ-

खंड वागतात. याप्रमाणें बादशहानें ऐकून तो तात्का-
ळ सडी स्वारी सिद्ध करून मशीदींत आला तेथें बिर-
बलानें सांगितल्या प्रमाणें एक खावंदाजुना साधू पाहि-
ला तेव्हां त्यास साष्टांग प्रणाम करून हात जोडून स्तु-
ती करिता झाला आणि म्हणाला महाराज आपलें वा-
स्तव्य कोठें आणि नांव काय इत्यादि विचारिलें असतां
तो प्रत्युत्तर कांहींच न देतां हातांतील माळेचा एकेक
मणी ओढून जप मात्र करीत आहे असें बादशहानें
पाहून त्यास म्हणाला कीं, सर्व पृथ्वीचा स्वामी मी आ-
हें त्यास मजपाशीं कांहीं तरी भाषण केलें पाहिजे आ-
पली इच्छा असेल ती पूर्ण करण्यास मी समर्थ आहें.
इत्यादि नानाप्रकारें बोलणें बोलला तथापि गुरुजीनें
कांहींच जबाब दिला नाहीं तेव्हां बादशहानें विस्मय
मानून एक लक्ष रुपये त्याजपुढें ठेवून म्हणाला मज-
पासीं भाषण करून आशीर्वाद द्यावा. अशी पराका-
ष्ठा केली तथापि तो गुरु द्रव्यास हात न लावितां किं-
वा तिकडे दृष्टीनें पाहिलें नाहीं व भाषण ही केलें नाहीं
असें पाहून बादशहा म्हणाला हा अज्ञानी पशुवत के-

वळ मूर्खच आहे असें मानून ते लक्ष रुपये अर्पण केलेले परत घेण्यास योग्य नव्हे यास्तव ते बिरबलाचे घरीं पाठवून दिले आणि बादशहा निघून कचेरीस आला. उपरांत बिरबलास जवळ बोलावून म्हणाला क्यों बिरबल मुरुखसें गाठपडी तो क्या करना, बिरबल म्हणाला चीपी रहना. याप्रमाणें ऐकून आपले मनांत म्हणाला बिरबलाचे गुरूजीस मी मूर्ख ठरविला परंतु चीपी रहना याचा अर्थ पाहिला असतां मजकडेच मूर्खपणा दिसतो मी नाना प्रकारें करून त्यास बोलण्या विषयीं युक्ती केल्या लक्ष रुपये ही दिले तथापि ते गुरूनें तृणप्राय मानून मलाच मूर्ख ठरवून चीप राहिला. याजवरून मजवर मूर्खपण आलें असें जाणून उगाच बसला. नंतर बिरबल तेथून निघून मशिदींत आला आणि मोळक्यास घरीं नेऊन त्यास करारा पैक्षां दुप्पट १०० रुपये इनाम देऊन वाटेस लाविला.

## गोष्ट ३४ वी.

## नलावांत ब्राह्मण बसल्याबद्दल.

एका समयीं बादशहाची स्वारी नलावावर आली

त्या तलावाचें उदक अत्यंत भयंकर आणि अतिशय थंडगार तसेंच अतिशय जड होतें तें पाहून बादशहा सहजावृत्ती बोलला कीं, सांप्रत माघमास थंडीचे दिवस असल्यामुळें हें उदक फारच गार झालें आहे यांत हात बुडविला असतां गळून पडावा असें होतें अशा या अत्यंत दुःख दायक उदकांत एकप्रहर पर्यंत कोणी मनुष्य बसेल काय? असें ऐकून कोणी ही तें कबूल करीनात तेव्हां बादशहा म्हणाला. अवघी रात्र या उदकांत कोणी बसेल तर त्यास पन्नास हजार रुपये बक्षीस देईन याप्रकारें बादशहाचें बोलणें झालें तेथें लोक मिळाले होते त्या सर्वांस कळलें तेव्हां त्यांतून एक गरीब ब्राह्मण दरिद्रानें पीडित झालेला होता त्यानें मनांत विचार केला कीं, आजपर्यंत दरिद्रानें अहोरात्र दुःख भोगिलें आणि पुढें ही चुकेल असें दिसत नाहीं याजकरितां उदकांत बसल्यानें मृत्यु आला तरी ही दरिद्र दुःखापासून मुक्तता होते आणि दैववशात वांचलों तर पन्नास हजार रुपयांची प्राप्ती होऊन दरिद्र विच्छिन्न होईल यांत दरिद्रापेक्षां

मृत्यु बरा असें एका मृतपुरुषाच्या शवाचें वचन त्या
चे ऐकण्यांत आलेलें होतें त्याचें त्यास स्मरण झालें.

उत्तिष्ठः क्षणमेकमुद्वहसखे दारिद्र्यभारंम
म श्रांतस्तावधिकं सखेन मरणं सेवे त्वदी-
यं सुखं ॥ इत्युक्त्वा धनवर्जितस्य वचनं श्रु
त्वाश्मशाने शवो दारिद्र्यान्मरणं वरं वरमि
ति ज्ञात्वेव तूष्णींस्थितः ॥ १ ॥ ॥

**अर्थ**- कोणी एक पुरुष दरिद्रानें अत्यंत पीडित असा
श्मशानांतून जात असतां तेथें मनुष्याचें एक प्रेत पडलें
होतें त्या प्रेतास तो दरिद्री हात जोडून म्हणाला हे सखे
मजला दरिद्राचें ओझें फार झालें आहे त्यामुळें मी अ-
तिशय थकलों आहें यास्तव त्वां क्षणभर उठून हें मा-
झें दारिद्र्य ओझें क्षणेक विसावा घेई पर्यंत त्वां ग्रह-
ण करावें. मी किंचित् विश्रांति घेऊन नंतर आपलें -
ओझें घेईन नंतर तूं सुखरूप आपले शवत्वाचा अं
गिकार करावा. याप्रकारें त्या धनवर्जिताचें भाषण
ऐकून तें श्मशानस्थ शव सजीव होऊन उभें राहून न-
बोलतें झालें कीं, दरिद्रापेक्षां मरणच श्रेष्ठ होय या-

मनांत त्यासीं बोलून पुनः पैनत्व अंगिकारिलें; या-स्तव तो दिल्ली शहरांतील ब्राह्मण मनांत विचार क-रिता झाला कीं, दरिद्रा पेक्षां मरण आलें तथापि उ-त्तम आहे असा मायावर उदार होऊन बादशहा पुढें येऊन म्हणाला खावंद बोलल्या प्रमाणें पन्नास ह-जार रुपये देतील तर मी या तलावाचे उदकांत सर्वरा-त्र बसतों असें त्याचें भाषण ऐकून बादशहानें कबू-ल करून तेथें ब्राह्मण तलावांत बसतो किंवा नाहीं हें पाहण्या करितां त्या ठिकाणीं पाहारा ठेविला. आ-णि बादशहा जाता झाला. नंतर तो ब्राह्मण द्रव्याचे आशेस्तव अवघी रात्र त्या तलावाचे उदकांत बसला दैव वशात् त्याचे प्राण वांचले. नंतर प्रातःकाळीं उठून बादशहा कडे बक्षिशीचें द्रव्य मागावयास गेला त्या-समयीं बादशहानें पाहारे करी यांस विचारिलें तेव्हां त्यानीं उदकांत बसला होता अशी साक्ष दिली नंतर पन्नास हजार रुपये ब्राह्मणास देणें विषयीं बादश-हा हुकूम करणार तों इतक्यांत बादशहा जवळ यवन लोक बसले होते त्यांस तें सहन न होता आपणांत-

म्हणतात कीं ब्राह्मणाचे घरीं रुपये व्यर्थ चालले हें चां-
गलें होत नाहीं. असा दुष्ट भाव मनांत आणून ब्राह्मणा-
स द्रव्य न मिळावें अशी युक्ती योजिली पण ती यथायु-
क्त निघेना तथापि यत्न करून पहावा असें योजून बा-
दशहास म्हणतात हा ब्राह्मण तलावांत मेला नसता
ता परंतु डोंगरांत वणवा लागला होता तो अवघी रात्र
यानें दृष्टीनें पाहिला या मुळें वांचला याप्रमाणें सेवकां-
चें बोलणें ऐकून बादशहा त्या ब्राह्मणास म्हणाला कीं,
त्वां डोंगरांतील वणवा पाहिल्या मुळें वांचलास ही गो-
ष्ट खरी आहे याजकरितां बक्षिशाचे रुपये तुजला मि-
ळणें नाहीं. असें बोलून त्यास तेथून काढून दिला.
नंतर तो रडत बिरबलाचे घरीं जाऊन त्यास सर्व ह-
कीकत सांगूं लागला आणि यवन लोकांचे कपट -
निवेदन केलें तें बिरबलानें एकून ब्राह्मणास आश्वासन
देऊन त्याचा ठावठिकाणा व नांव विचारून घेतलें नंत-
र त्यास घरीं लावून दिला. दुसरे दिवशीं कचेरीस जा-
ण्याचे समयीं बिरबलानें नदीचे तीरीं तीन कळक पंच
वीस तीस हात उंचीचे उभे करून त्या तिहींचे माथ्या

वर एका लहानशा भांड्यांत डाळ आणि तांदूळ घा-
लून पाण्यानें भरून तें भांडें वर ठेविलें आणि गव-
ताच्या दोन तीन पेंढ्या घेऊन तळीं एकेक काडी गव-
ताची पेटवून जाळ लावीत बसला. इकडे कचेरी त-
माम भरून बादशहा येऊन कचेरीस बसला तथा
पि बिरबलाचा ठिकाण नाहीं यास्तव त्यास बोलाव
ण्या करितां भालदार पाठविला तो येऊन बिरबला-
स म्हणाला बिरबल साहेब तुमकों खावंद बुलाते
हैं तेव्हां बिरबल म्हणाला खिचडी की हांडी पकाता
हूं फेर आवेगा असें सांगितलें त्याप्रमाणें भालदारा
नें येऊन बादशहास कळविलें. नंतर घटिकाभर-
गेल्यावर आणीक बोलावूं पाठविलें त्याजबरोबर
ही तसाच निरोप पाठविला. अशी घटके घटकेचे अ-
वकाशानें पांच चार बोलावणीं पाठविलीं तितक्या
ही बरोबर तसाच निरोप पाठविला. असा एक प्रह-
र लोटला बिरबला वांचून कचेरींत कामाचा खो-
ळंबा फार झाला. तेव्हां बादशहा म्हणाला इत्ना दे-
र बिरबल हांडी कायकी पकाता हैं असें बोलून स्व-

नः बादशहा नदी तीरीं येऊन पहातो तों दूर अंतरा-
वर हांडी असून तळास एकेक गवताची काडी जाळी-
त बिरबल बसला आहे असें पाहून बादशहा म्हणा-
ला. अबे बिरबल तुम् क्या मुरख है असमानपर हां
डी रखी हैं औ घासके आगसे कैसी पकेगी बिरबल
म्हणाला दोन कोशांवर डोंगरांत वणवा लागला होता.
तो पाहून त्याचे शेकानें अदकांत ब्राह्मण जसा वांच-
ला तशी माझी हांडी शिजण्यास काय हरकत आहे,
माझी हांडी शिजली जाणार नाहींतर ब्राह्मण दोन-
कोशांवर कसा वांचला. याप्रमाणें ऐकून बादशहा म्ह-
णाला तुम कहे सो सच्चा हैं अबी हमकों मालूम पडे
असें बोलून तत्काळ त्या ब्राह्मणाचा गांव ठिकाण-
आणि नांव बिरबलास विचारून त्याजला तेथें आण
विला आणि पन्नास हजार रुपये तावडतोप देऊन-
त्याचे घरीं पोंचतें केले. तेव्हां तो ब्राह्मण अत्यंत हर्ष
पावून बिरबलाचे मोठे उपकार मानून त्याचे गुण व-
र्णिता झाला. आणि आनंदयुक्त होऊन घरी जाऊन
सुखरूप प्रपंच करूं लागला.

## गोष्ट ३५ वी.

## अजब् तमाशा.

एका समयीं बादशहा आणि बिरबल बसून स्वस्थ चित्तें गोष्टी बोलत असतां बादशहा म्हणाला बिरबल सुनो पिछे कबई हूवा नही और आगोबी होनेका नहीं ऐसा अजब तमासा तुम दिखला वोगा बिरबल म्हणाला हांजी खावंद यांत काय अंदेशा आहे खावंदाना हुकूम होईल तर करून दाखवितां येईल. परंतु दोन लक्ष रुपये या कामास खर्च लागेल तांखावंदांनीं दिला पाहिजे आणि या कामास गुन्हा झाल्यास माफ असला पाहिजे असें होईल तर एक वर्षांत अजब् तमाशा दृष्टीस पडेल. या प्रकारें त्याचें भाषण ऐकून बादशहानें तें कबूल करून दोन लक्ष रुपये तात्काळ दिले ते बिरबलानें घेऊन त्यापैकीं एक लक्ष रुपये दान धर्म खैरात खर्च सत्कारणीं व्यय करून एकलक्ष रुपये आपले जामदार खान्यांत ठेविले. नंतर कांहीं दिवस लोटल्यावर त्यानें दुखण्याचें मिस करून घरीं निजला. मोठे मोठे वैद्य आणि हकीम

षी आणून उपचार चालविले बादशहास सांगून पाठविलें कीं, माझी अवस्था बरी दिसत नाहीं अंतकाळ समीप आला असा निरोप पाठवून मध्य रात्रीस काळ झाल्याचा पुकारा करून एका गुप्त स्थानीं घरांत खोलींत जाऊन बसला ते वर्तमान एक त्याच्या स्त्रीस मात्र माहीत होतें. उपरांत सर्व लोकांस समजण्या साठीं मृतविधी श्मशानीं करवून आपण गुप्त रहाता झाला. नंतर बादशहानें बिरबलाचा काळ झाला ऐकून त्या साठीं फार खेद मानून चिंताक्रांत झाला. यवन लोक आदी करून दुष्ट दुर्जन होते त्यास हर्ष होऊन शर्करा वांटिते झाले या गोष्टीस चार सहा महिने लोटल्यानंतर बिरबलानें आपले स्त्रीस सांगून निजकडून शहरा बाहेर एक पर्वताची टेंकडी उंच होती त्याजवर लहानसा बंगला सर्वोत्कृष्ट रमणीय मनोहर असा सातमजली एक रात्रीं तयार करविला त्यास नन्हे नन्हेचे सुरंगीत आरसे सुवर्णाचे कोंदणांत बसवून त्याजवर सूर्याचे किरण पडले असतां दोन कोश आसमंतात भागीं त्या-

नें तेज व झळाळी सुरम्य दिसावी. असा अत्यंत मोलेचा बंगला अगोदर सर्व तयार करून एकारा-त्रींत त्या टेंकडीवर सामान तयार केलेलें नेऊन आ-पले सेवकां व्यतिरिक्त कोणास न कळतां तयार केला नंतर दुसरे दिवशीं बिरबलानें लोकांचे रूढींत ना-हींत अशीं अमोल्य वस्त्रें परिधान करून तसेंच सर्वो त्कृष्ट अलंकार सुदाळ मौक्तिकहार कांहीं खरें कां-हीं खोटें नकली तेजस्वी लोकोत्तर दिसण्या सारखे लखलखीत तेजोमय असे आंगावर घालून घरांतू न निघता झाला. सहा महिने आंगास ऊन न लागल्या मुळें तसेंच सुग्रास अन्न सेवना मुळें त्याचे आंगावर पहिल्या पेक्षां तेज विशेष चढलें असून अमोल्य व-स्त्रालंकाराचा योगानें त्यानें स्वरूप फारच सतेज आ-णि सुशोभीत दिसलें. असा सर्वोत्कृष्ट थाट करून-अकस्मात बादशहाची कचेरी सघन भरली असतां तेथें येऊन बादशहाचे समोर उभा राहिला. त्याचे-स्वरूपाचे आणि वस्त्रालंकाराचे तेजानें सर्व कचे-री दिपोन गेली. कोणी ही त्यास हा बिरबल आहे अ-

सें न ओळखितां सर्वलोक विस्मित होऊन त्याजक-
डे पहात राहिले. बादशहानें ही त्यास न ओळखून-
म्हणाला आपण कौन बडे अल्लाके लाल तुमारा कौ-
न मकान क्हाका हॅ कारन आयाहे याप्रकारें बादश-
हाचें बोलणें ऐकून बिरबल म्हणाला महाराज मी-
खावंदांचा नोकर ज्यान्ला बिरबल आपण म्हणत हो-
तेत तोच मी आहें बादशहा म्हणाला तुम् तो मरगया
था सो अब् तुम कैसा आया बिरबल म्हणाला मी मे-
ल्या नंतर स्वर्गास गेलों तेथें इंद्राची दिवाणगिरी मि-
ळाली तेथील सौख्य काय सांगावें जें मनास वाटेल
तें खावें प्यावें ल्यावें अप्सरादि स्त्रिया भोगाव्या
अमृत पान करावें इत्यादि जें सौख्य आहे ते वर्ण-
न करितां ही येत नाहीं बादशहा म्हणाला ऐसा सु-
ख छोरके तुम् अबी वुहा काहेकों आया बिरबल-
म्हणाला आपण पहिले खावंद धनी यास्तव आप-
ले पायाचें दर्शन घेण्या करितां देवेंद्राची आज्ञा घे-
ऊन आलों आहें खावंदां करितां स्वर्गींची एकचीच
आणिली आहे संपूर्ण अप्सरांत श्रेष्ठ अत्यंत स्वरू

पवान अशी आणिली आहे त्या व्यतिरिक्त आणखी अमोल्य वस्त्रालंकार तसाच एक बंगला ही आणिला आहे त्यांत अनेक वस्तु भरल्या आहेत तो बंगला आपले शहरा बाहेर पहाड आहे त्या पर्वतावर ठेविला आहे त्यांत नाना वस्तु आदिकरून सर्व भरलें असून अप्सराही त्याच बंगल्यांत आहे या प्रमाणें बिरबलाचें भाषण ऐकून बादशाहास तें संपूर्ण सत्य वाटलें कारण बिरबल मृत्यु पावला असून उत्तम स्वरूप पावोन पुनः परत आला असें जाणून सर्व मजकूर त्यास सत्य वाटला तथापि आणखी लोकांचे मुखानें खरें खोटें कळण्या करितां त्याणे नवीन प्रधान नेमिला होता त्यास आणि दुसरे मुत्सद्दी समागमें देऊन सांगितलें कीं, तूं जें सांगितलेंस तें यांजला दाखवावें तेव्हां त्या सर्व लोकास बिरबलानें समागमें घेऊन जेथें बंगला तयार केला होता त्या टेकडीचें तळवटास आला आणि त्या बंगल्यांत कांहीं नसून उगाच मिथ्या त्या लोकांस तेथून दुरोन बोटानें दाखवून म्हणाला. पहा ती अप्सरा बंगल्याचे शो-

वरील मजल्यावरील खिडकींत बसली आहे आपण बहून जण आलों पाहून आपल्याकडे नजर करून अवलोकीत आहे तिचें मुख सुंदर काय हो? पहा पहा चंद्रासारिखें विराजमान दिसत आहे तिच्या स्वरूपाची आणि अलंकारांची प्रभा फांकल्यानें हा बंगला किती सुशोभित दिसतो पहा. याप्रमाणें तोंडच्या गप्पा पाहिजे तितक्या बोलून त्या लोकांस म्हणाला खरें आहे कीं नाहीं तें नीट न्याहाळून पहा बादशहास खरें खरें सांगितलें पाहिजे त्या समयीं तो प्रधान आणि मुत्सद्दी तसेच मोठमोठे सरदार आदिकरून सर्व लोक आपल्याशीं म्हणतात कीं, बिरबल हा पिशाच्च होऊन आला आहे कीं काय? हा जितकें जितकें बोलून हातानें दाखवितो त्यांतून कांहीच कोणाचें ही दृष्टीस पडत नाहीं. बंगला मात्र सुंदर मनोहर लखलखीत अप्रतीम असा दिसत आहे याप्रमाणें आपण आपले जवळ बोलून बिरबलास म्हणतात. तुह्मीं जें जें दाखविलें त्यांतून कांहींच कोणाचें ही दृष्टीस पडलें नाहीं. त्या समयीं बिरबल म्हणाला मजकडून सांगण्यांत प्रथमच चुकी-

झाली आहे. आतां सांगतों तें ऐकून पुनः नीट नेत्र उघडून अवलोकन करावें म्हणजे मी सांगितलें तितकें खरें किंवा खोटें हें तुह्मा अवघ्यांस प्रत्यक्ष दिसून येईल, असें म्हणून सांगता झाला कीं, मृत्युलोकींचीं पातकी मनुष्यें त्यांत आणखी मुख्य कारण सांगतों जो मनुष्य पित्याचे वीर्या व्यतिरिक्त अन्य पुरुषाचे वीर्यापासून जन्मास आला असेल त्यामनुष्यांस स्वर्गींच्या वस्तू पैकीं बंगल्या शिवाय एकही वस्तु दृष्टीस पडावयाची नाहीं एवढी अडचण मोठी आहे याजकरितां तुह्मी सर्वलोक नीट डोळे उघडून मी दाखवितों तें दृष्टी लावून स्वस्थपणानें अवलोकन करावें म्हणजे दृष्टीस पडेल असें सांगून पुनः दाखवितो हा बंगला अतिसुरम्य येथें पाहिला नसून आजच उत्पन्न झाला हा सर्वांनीं पाहिला. आतां या बंगल्याचे सातवे मजल्याची खिडकी पूर्व बाजूची पाहिली. तेव्हां प्रधानादिक म्हणतात बंगला नवीन उत्पन्न झाला असून त्याची खिडकीही पाहिली. नंतर पुनः बिरबल म्हणाला. त्याच खिडकींत जिचें चंद्रासारि-

रवें वदन अशी स्त्री बसली आहे ती पाहिली, असें ऐकून कोणाचे ही दृष्टीस ती पडली नाहीं तथापि ज्या-ने ज्यानें आपले मनांत विचार केला कीं, दिसली ना-हीं म्हणावें तर इतक्या लोकांत आपले बापाचे वीर्या चा नसून अनेक बापांचा असें होऊन सर्व जगांत फ-जीती होईल यास्तव स्त्री पाहिली असें म्हणावें पुढें काय होईल तें होऊ याप्रकारें मनांत विचार करून-जो तो म्हणों लागला कीं, वाहावा !!! कायहो ती स्त्री फारच सुंदर दिसत आहे अशी कोणी स्वप्नांतही पा-हिली नसेल. आपले समुदाया कडे पाहून हांसत आ-हे जिच्या मुखावलोकनानें तहान व भूक हरावयाची. इत्यादि बिरबला पेक्षां विशेष स्तुती करिते झाले ते-व्हां बिरबल म्हणाला बादशहास आप्रमाणेंच सांग-ण्यास अंदेशा तर नाहीं कीं कोणी नीट पाहिली नस ल्यास पुर्तेपणें पुनः पहावी. प्रधानादिक म्हणतात आतां अंदेशा काय राहिला प्रत्यक्ष डोळ्यांनीं सम-क्ष पाहिली असें सर्व लोकांचे मुखानें पुनः खरें क-रून बिरबल त्यास घेऊन माघारा कचेरीस आला.

तेव्हां बादशहा त्या लोकांस म्हणाला बिरबलानें सांगितल्या प्रमाणें स्वर्गींची हवेली आणि अप्सरा नृत्यों प्रत्यक्ष पाहिली प्रधानादिक म्हणतात बिरबलानें सांगितल्या पेक्षां ही अत्यंत रमणीय मनोहर बंगल्यांत अनुपम्य सुंदर अप्सरा सर्वांनीं प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिली. याप्रकारे ऐकून बादशहास अतिशय आनंद होऊन बिरबलास म्हणाला तूं जाऊन त्या अप्सरेस शहरांत घेऊन यावें बिरबल म्हणाला ती अप्सरा स्वर्गवासी दुर्लभ वस्तु आणि ती श्रीमान प्रतिष्ठित सर्व देवांस मान्य याजकरितां खावंदां नीं तेथें स्वतः चलून तिचा आदर सत्कार करून नंतर आणण्याचा विचार करावा. याप्रमाणें बादशहानें ऐकून तात्काळ स्वारी सिद्ध करण्याचा हुकूम करून निजलों आपलें वैभव दाखविण्या करितां सर्व लोकांस ताकीद केली कीं, उंच उंच वस्त्रालंकार उत्तम पोषाग करून चलावें म्हणून सांगितलें त्या प्रमाणें सर्व लोक तयार होऊन निघते झाले बादशहा ही मोठा उत्साहयुक्त आनंदानें बिरबलास समागमें घेऊन पर्वताचे

तळवरास संपूर्ण लोकांसहीत येता झाला तो बंग-
ल्याचे आरशांवर सूर्यकिरण पडून त्या तेजानें स-
र्व लोकावर लखलखीत विपुल प्रकाश पडला होता.
बादशहानें तो रमणीय बंगला पाहून अत्यंत संतोष
मानिता झाला. त्याकाळीं बिरबल पुढें येऊन म्हणा-
ला आतां सर्व खटला येथेंच ठेवून प्रधान मुत्सद्दी-
आदिकरून मोठमोठे लोक पांचशें मंडळी पर्यंत
समागमें घेऊन खावंदांनीं बंगल्यांत चलावें असें-
एंकून त्या प्रमाणें थोर थोर मंडळी समागमें घेऊन बा-
दशहा बंगल्याजवळ आला त्यासमयीं बिरबल म्ह-
णाला महाराज थोडकीसी वर नजर करून पहावें सा-
तवे मजल्यावर त्या पूर्वेच्या बाजूचे खिडकींत बस-
ली आहे ती अप्सरा आणि अंजारीं उभी राहून पाना-
चे विडे करून देत आहे तीनची दासी होय त्यादासी-
चे रूपाचे शतांशें करून ही आपले राणी साहेबांचें
स्वरूप नाहीं मग अप्सरेचे स्वरूपाची तारीफ काय सां-
गावी. प्रत्यक्ष नजर करता करून पहावें बादशहा म्ह-
णाला बिरबल तुम कहता है सो कहां है बिरबल म्ह-

णाला प्रधानजीस आणि सर्व लोकांस पुसावें मी-
खोटें सांगतों काय तेव्हां प्रधानादिक लोक मूर्ख त्या-
नें फजीतीचे कारणास्तव म्हणतात खावंदांनीं अ-
द्याप पाहिलीच नाहीं कायती खिडकींत पहा अप्स-
रा बसली असून समीप दासी उभी आहे तिचा हात
धरून ती गोष्टी बोलत आहे असें ते लोक बोलतेझा-
ले तथापि बादशहाचे दृष्टीस कांहीं पडेना म्हणून वि
क्षिप्ता सारखा चहूंकडे पाहूं लागला तेव्हां बिरबल
म्हणाला खावंद मी एक गोष्ट आपल्यास सांगण्या-
विषयीं चुकलों आहें ती आतां सांगतों नीट श्रवण-
करावी. स्वर्गलोकींचीं मनुष्यें तसेंच देव आणि देवां-
गना फार काय सांगावें वस्त्रालंकारादिक सर्व वस्तु
मात्र जोजो पदार्थ आहे तितका मृत्युलोकींचे मनु-
ष्यांस दिसणें अति दुस्तर आहे त्यांतून जे पुरूष एका-
वीर्याचे म्हणजे एकाच बापाचे असतील ज्यांचे माते-
नें जारकर्म केलें नाहीं असे जे पुरुष असतील त्यांच्या
दृष्टीस स्वर्गींच्या वस्तु पडतात जे अनेक वीर्यां पासून
उत्पन्न झाले असतील त्यांस महाला शिवाय इतर

वस्तू दिसणें नाहीन याजकरितां रवावंदांनीं नीट चां- गली दृष्टी लावून पहावें म्हणजे दिसण्यांत येईल. या प्रमाणें बादशहानें ऐकून मनांत म्हणतो कीं सर्व- लोकांस देवांगना आणि दासी दिसत असून मलाच कांहीं दिसत नाहीं तेव्हां मी आपले पित्याचे वीर्याचा नसून अन्य बीज्या पासून उत्पन्न झालों आहें कीं कीं काय नकळे परंतु आज पर्यंत जी गुप्त गोष्ट आहे ती सांप्रत मजला स्वर्गाची वस्तु दिसत नाहीं असें बोललों असतां बादशहा अन्य बीजाचा या प्रमाणें लोकांत प्रसिद्धी होऊन चहूंकडे पृथ्वीभर अपकी- र्ती होणार तें चांगलें नाहीं यास्तव स्वर्ग संबंधीं कां- हीं ही वस्तू बिरबल दाखवील किंवा देईल ती तो दृ- ष्टीस न पडेल तथापि खरी आहे उत्तम आहे इत्या- दि बोलून तिची स्तुती केली पाहिजे. असें निश्चया- त्मक मनांत आणून डोळ्यांस पाणी लावून बंगल्या कडे पाहून म्हणाला अबे बिरबल तुम् कहते हॆ सो अब् दिखता हॆ इत्ने बखत आखों को क्या हुवाथा मालूम नहिं अब नजरमे सब अवता हॆ या प्रमा-

णें बिरबलानें ऐकून नंतर बादशहा समवेत सर्व-
लोकांस त्या बंगल्यांत नेलें आणि मखमालीचे रु-
जाम्याच्या बिछायती घातल्या होत्या त्यांजवर आ-
णून बसविलें आणि विडे पानसुपारी हार तुरे गजरे
अत्तरादिक सुवासिक पदार्थ सर्वांस देऊन बिरबल
म्हणाला कीं, मृत्यु लोकींचीं वस्त्रें भूषणें परिधान
केलेलीं आहेत हीं कांहीं काळानें तरी नष्ट व्हावया
चीं याजकरितां तीं अवघीं समस्तांनीं सोडून येथें
ठेवावीं आणि स्वर्गलोकींचीं वस्त्रें भूषणें तसेंच अ-
लंकार कधींही नाशाप्रत पावणार नाहींत या प्रकार
चे स्वर्गींहून अमोल्य अति सुंदर प्रयत्नें करून आ-
णिलेले वस्त्रांचा स्वीकार सर्वांनीं करावा असें बोलून
प्रथम बादशहास मात्र खरोखरीचा सर्वोत्कृष्ट पोषा
ख दिला कारण त्याची बेअदबी न होतां अब्रू राहि-
ली पाहिजे आणि त्याचे मनांत विशेष विषाद पुढें मा-
गें न यावा म्हणून खरोखरीचा पोषाख त्यास मात्र
दिला नंतर प्रधानास शब्दक शाब्दिक पोषाख आणू-
न उगाच त्याच्या हातास हात मात्र लाविला आणि

त्यास योजना झाली कीं, नेसल्या वस्त्रास्कट्टां सोडून टाकून हा स्वर्गींचा अमोल्य दिव्य पोषाख उंची दिलेला परिधान करावा. या प्रकारें प्रधानानें ऐकून मोठ्या विचारांत पडला. आणि मनांत म्हणतो हा स्वर्गींचा शब्द पोषाख घेऊन नग्न दिगंबर व्हावें लागतें कदाचित नाहीं म्हटलें तर अनेक बापाचा अशी सर्व लोकांत फजीती होणार त्या पेक्षां अवघ्यां बरोबर नग्न व्हावें हेंच उत्तम आहे असें जाणून आंगा वरील सर्व वस्त्रें काढून दिलीं आणि उगाच आंगा भोंवता हात फिरवून स्वर्गींचा पोषाख परिधान केला असें दाखविलें आणि नग्न दिगंबर होऊन बसला त्या काली तें सर्व लोकांनीं पाहून मनचे मनांत हसों लागले त्या हसण्यानें पोटें फुगण्याचा समय आला प्रसिद्ध हंसण्यास अडचण म्हणून आंवले आंत पोटांत जिरविते झाले या प्रमाणें प्रधानास पोषाख दिल्यानंतर त्या प्रकारेंच सर्वांस शब्दाचा पोषाख देऊन आंगावरील सर्वांचीं वस्त्रें काढून घेऊन अवघ्यांस वस्त्र रहित केलें. ती नग्न कचेरी बादशाहानें पाहून विस्मित होत्साता त्या विप-

रीत कर्मांचा क्रोध मनांत न आणितां स्वर्गींचें अद्भु त चरित्र आहे असें मानून उगाच स्तब्ध रहाता झा ला. नंतर अप्सरेस विचारण्या करितां बिरबल कचे रींतून उठून वरील सातवे मजल्या वर जाऊन आला असें दाखवून बादशहा जवळ येऊन म्हणाला कीं, अप्सरेचें बोलणें असें आहे कीं, आतां खावंदाची स्वारी घरी जाऊन रात्रो येथें येण्याची तजवीज अ सावी. या स्थळीं हवा चांगली आहे सबब मी आज शहरांत येत नाहीं. आतां मी तुमचीच आहें आप ल्यास सोडून कोठें ही जाणें नाहीं. आतां खावंदांची भेट घ्यावी तर मनुष्य समुदाय विशेष आहे यास्तव रात्रो सडी स्वारी निशीं येथें यावें असें देवांगनेचें म्ह णणें आहे त्यास प्रथम तिचे मर्जी प्रमाणेंच चाललें पाहिजे एकदां ती आपले बसांत आल्यावर पाहिजे तसें करितां येईल. आतां घरीं निघून चलावें असें म्ह णतांच बादशहा आणि सर्व लोक नग्न तसेच निघाले त्यांस शहरांतून मिरवीत मिरवीत बिरबलानें कचेरीं त आणिलें तेव्हां शहरचे लोक त्यांस पाहून पोटें धरध-

रून हसूं लागले त्यांस नग्न लोक म्हणतात कीं, तुह्मीं-हसणारे सर्व मूर्ख आणि पातकी अनेक बापाचे आहांत म्हणून आमचे आंगावरील स्वर्गीची वस्त्रें प्रावर्णे तुम्हांस दिसत नाहींत. असें ऐकून शहरचे लोक म्हणतात. आम्हीं मूर्ख किंवा तुह्मीं मूर्ख हें कांहीं दिवसांनीं कळेल बिरबलानें हा कांहीं अजब तमासा केला असावा. असें वाटतें. पूर्वीं बादशहा जवळ त्यानें कबूल केलें-आहे इत्यादि बोलून त्यांचा विनोद करितें झाले उपरांत बादशहाचे वाड्यांत सर्व लोक कचेरीस येऊन नग्नतसेच बसले. नंतर बिरबलानें बादशहास एकीकडे बोलावून आपून गुन्हा माफ असल्याचें वचन पूर्वींच घेतलें होतें तें प्रगट करून हात जोडून म्हणाला खावंदांनीं गुन्हा माफ अशी भाष देऊन अजब् तमासा दाखविण्या विषयीं हुकूम केला होता त्याजवरून हा अजब् खेळ मागें कधीं झाला नाहीं आणि पुढें होणें नाहीं असा करून दाखविला. नाहींतर मृत्यु पावलेला प्राणी पुनः त्याच देहातें पावून मृत्यु लोकीं कोणी कधीं तरीं आला आहे कीं काय? तशीच अप्सरा मृत्युलोकीं

या कलियुगांत कशाची ग्रंतें तसीच नग्न सभा कधीं-
तरीं पाहिली किंवा ऐकिली तरी आहे काय? ती सांप्रत
खावंदांचे समीपच आहे असें कधीं झालेंच नाहीं आ-
णि पुढें ही होणें नाहीं असा हा अजब् तमासा खावं-
दांस दाखविला असें सांगून ज्याज्या लोकांचीं वस्त्रें
प्रावर्णें घेतलीं होतीं तीं त्यांस परत दिलीं तीं ज्यांचीं
त्यांनीं घेऊन पूर्ववत प्रमाणें नेसून अत्यंत लज्जित-
होऊन बिरबलाचे कृत्या विषयीं परमाश्चर्य आणि खे-
द ही मानून घरोघर जाते झाले. बादशहानें बिरबला
स शाबास की देऊन आणखी एक लक्ष रुपये बक्षी-
स दिले आणि गांव इनाम करून दिला.

## गोष्ट ३६ वी.

### येथें आहे तेथें नाहीं. येथें नाहीं ते-
### थें आहे, येथें नाहीं तेथें नाहीं,
### येथें आहे तेथें आहे याविषयीं.

एके दिवशीं बादशहा दरबारांत बसला असतां
बिरबलास म्हणाला "येथें आहे तेथें नाहीं, येथें ना-
हीं तेथें आहे, येथें नाहीं तेथें नाहीं, येथें आहे तेथें-

आहे" या प्रकारच्या चार वस्तू आणून हजीर करा-
व्या हें ऐकून बिरबल अक्कलवान् असल्यामुळें ता-
त्काळ उठोन शहरांत गेला आणि एक वारांगना, एक
सन्याशी, एक याचक, एक द्रव्यवान् धार्मिक गृहस्थ,
असे चौघांस बरोबर घेऊन बिरबल बादशहाचे क-
चेरीस आला आणि विनंती केली कीं, खुदावंत हुकु-
मा प्रमाणें चार जिनस हजीर केल्या आहेत त्यांचा-
तपशील:- प्रथम वारांगनेस उभी केली आणि म्ह-
णाला ही वारांगना आहे हिला या लोकीं सुख आहे
परंतु मरणानंतर पापामुळें स्वर्गलोकीं सुख लेशही
प्राप्त होणार नाहीं. असें सांगून सन्यासी यास उभा
केला आणि म्हणाला यास येथें वेळेवर अन्नही मि-
ळत नाहीं यामुळें येथें दुःख असून मरणानंतर पु-
ण्य कर्मामुळें स्वर्गास गेल्यावर तेथें अतिशय सुख
पावेल असें सांगून तिसरा याचक उभा केला आणि
म्हणाला हा याचक आहे नित्यशः लोकांचे घरीं बो-
लाविल्या वांचून कांहीं तरी प्राप्त व्हावें म्हणून मागा-
वयास जातो व नित्य आगांतुकी करून उदर पूर्ती-

करितो याचे हातून पुण्यकर्म मुळींच होत नाहीं या-
मुळें याला दोन्ही जागीं सुखाचा लेशही प्राप्त होत-
नाहीं असें सांगून चौथा द्रव्यवान् सावकार उभा के-
ला आणि म्हणाला कीं, हा गृहस्थ द्रव्यवान् असोन
धार्मिक आहे यामुळें याला यालोकीं सुख आहेच.
परंतु मरणा नंतर पुण्याईच्या योगें करून स्वर्ग प्रा-
प्त होईल याजकरितां याला कोठेंच दुःख नाहीं. या-
प्रमाणें बिरबलाचीं भाषणें ऐकून संपूर्ण सभासदां
सहित बादशाहा आनंद पावला. नंतर बिरबलानें
आणलेले लोकांस त्यांचे त्यांचे योग्यते प्रमाणें पो-
षाख वगैरे देऊन त्यांस घरीं जाण्यास निरोप दिला.
व बिरबलास पांच गांवच्या वंशपरंपरेच्या इनामा-
च्या सनदा करून देऊन त्यासही पोषाख देऊन त्या-
चा उत्तम प्रकारें सत्कार केला.

## गोष्ट ३७ वी.

## मालादे याविषयीं.

एके दिवशीं बिरबल सकाळीं उठोन यमुनेवर
गेला आणि तेथें स्नान करून तटाकीं संध्यादिक आ-

टोपून हातांत माळ घेऊन जप करीत बसला असतां त्या मार्गानें बादशहाची स्वारी रात्रीस शिकारी करितां गेली होती ती परत आली आणि पाहिलें तों बिरबल हातांत माळ घेऊन जप करीत बसला आहे त्या समयीं बादशहा घोड्यावरून खालीं उतरून बिरबला जवळ आला आणि त्यास म्हणाला "बिरबल माळ्या दे" हें ऐकून बिरबलास अतीशय राग आला. परंतु करतो काय? जबरदस्ताशीं गांठ तेव्हां क्षणेक विचार करून आपले आंगावरील शाल काढून नदींत टाकिली. ती नदीचे वेगानें वाहून चालली तेव्हां बादशहा बिरबलास म्हणाला अबे बिरबल दुशाला बहतो है हें ऐकून बिरबल म्हणाला बाहाण दव तें ऐकून बादशहास अतीशय राग आला व बिरबलास म्हणाला आमची बहीण तूं मागतोस कांहीं लज्जा वाटत नाहीं बिरबल म्हणाला खावंद माझी आई आपण मागितली तेव्हां कांहीं विचार केला नाहीं बादशहा म्हणाला मी तुझी आई मागितली नाहीं फक्त तुझे हातांत असलेली माळ मागितली. बिरबल म्हणाला मी-

ही तुमची बहीण मागितली नाहीं. बाह्मण देव म्हणजे वाहूंदे असें बोललों हें ऐकून बादशहा उगाच बसला तात्पर्य "जशास तसें भेटे आणि मनचा संशय फिटे."

## गोष्ट ३८वी.

## परटाच्या गाढवाची.

एके दिवशीं बादशहा, बिरबल व बादशहाची राणी अशीं त्रिवर्ग बागेंतील तळ्यावर स्नानास गेलीं त्यासमयीं राणी व बादशहा यानीं आपआपले आंगावरील कपडे काढून बिरबलाजवळ दिले आणि आपण उभयतां तळ्यामध्यें स्नानास उतरले. बिरबल तीं बादशहाचीं व राणीचीं वस्त्रें घेऊन तळ्याचे कांठावर उभा होता तें पाहून बादशहा म्हणाला पहा बिरबल कसा परटाचे गाढवा सारखा वस्त्रांचा बोजा घेऊन उभा राहिला आहे तें ऐकून. बिरबल म्हणाला खुदावंत हा सरकारचा गाढव इतका बळकट आहे कीं, दोन गाढवांचा बोजा घेऊन उभा राहिला आहे हें ऐकून बादशहा लज्जित-

होत्साता उगाच राहिला.

## गोष्ट ३९ वी.

## कापसाचे चोरी विषयीं.

दिल्ली शहरांत एका व्यापाऱ्याचे घरीं पुष्कळ कापसाचे गठ्ठे चोरीस गेले त्याचा तपास करितां कोठें पत्ता लागेना तेव्हां तो व्यापारी बादशहा कडे गेला आणि झालेलें वर्तमान सांगून ज्या लोकांवर वहीम होता त्यांची नांवें कळविलीं. नंतर बादशहानें त्या लोकांस बोलावून आणविलें आणि तपास केला परंतु ठिकाण लागेना शेवटीं तें काम बिरबला कडे दिलें आणि चोराचा थांग लावण्यास सांगितलें ते समयीं बिरबलानें त्या सर्व वहिमी लोकांस उभें केलें आणि बराच वेळ झाल्यावर म्हणाला काय हो चमत्कार हा कापूस चोरून तो चोरला नाहीं म्हणून बादशहा जवळ बोलतो आणि कापूस तर दाढीस लावून निर्लज्ज पणें कचेरींत उभा राहिला आहे इतकें बोलतांच ज्यानें कापूस चोरला होता त्यानें आपले दाढीवर हात फिरविला. बिरबलाची नजर सर्वांवर हो-

तीच तात्काळ बिरबलानें त्यास दूताकरवीं ताडण करितांच तो कबूलीस आला आणि सर्व कापूस आणून हजीर केला तो व्यापाऱ्यास दिला. आणि गुन्हेगारास शासन केलें.

## गोष्ट ४०वी.

### चाकरास चुना खाऊं घालण्याची.

एके दिवशीं बादशहा गच्चीवर तोंड धुवीत बसला असतां एकदोन जागीं गच्ची फुटली होती ती दृष्टीस पडली तेव्हां जवळ चाकर होता त्यास सांगितलें कीं, चुना आणवून गच्चीस लावून दुरुस्त करावी परंतु त्या गोष्टीचें चाकरास स्मरण न रहातां चुना लावणें राहिला. दुसरे दिवशीं बादशहा तोंड धुवावयास बसला तों त्या गच्चीचे भेगीवर नजर गेली. तें पाहून त्या चाकरास हुकूम केला कीं, जलदी लोणारी याचे घरीं जाऊन एकशेर चुना घेऊन ये तें ऐकून चाकर लोणारी याचे घरीं जावयास निघाला. वाटेवर बिरबलाचें घर होतें व बिरबल दारांत उभा होता त्यास प्रणाम करून घरांत गेला बिरबलानें

त्यास कोठें जातोस म्हणून सहज विचारिलें चाकर म्हणाला गच्चीस भेगा पडल्या आहेत त्या चुनाला- वून दुरुस्त करण्यास काल रोजीं सरकारचा हुकूम- झाला होता परंतु त्या गोष्टीचें स्मरण मजला राहि लें नाहीं व चुना लावणें तसाच राहिला आणि आज पुनः सरकार स्वारी तोंड धुवावयास बसली असतां भेगीवर नजर गेली. तेव्हां आज्ञा जहाली कीं, लोणा- री याचे घरीं जाऊन एक शेर चुना जलदी घेऊन ये म्ह णून लोणारी याचे घरीं जात आहे हें ऐकून बिरबल म्हणाला बाबा तुझीं शंभर वर्षे भरलीं आतां बाद- शहा तो शेरभर चुना जुलमानें तुजकडून खावविल आणि तूं मरशील हें ऐकून चाकर भयाभीत झाला आ- णि बिरबलाचे पायां पडून पुढें विचार काय करावा. म्हणून विचारूं लागला. ते समयीं बिरबलास त्याची दया येऊन त्यास म्हणाला लोणारी याचे घरून अ- र्धाशेर चुना घे आणि गवळी याचे घरींहून अर्धाशेर लोणी घे तीं दोन्हीं एकत्र करून बादशहाकडे घेऊन जा म्हणजे बादशहा तो चुना खाण्याविशीं तुजला

आज्ञा करील तेव्हां तो तूं बेलाशक खा त्यापासून तुला कांहीं इजा होणार नाहीं हें ऐकून चाकरानें त्याप्रमाणें लोणी व चुना मिश्रित करून बादशहाकडे घेऊन गेला. तो ऐनांव बादशहा म्हणाला मूर्खा मी तुला काल गच्चीस चुना लावण्या विषयीं हुकूम केला असोन तोंतूं हयगयीनें लाविला नाहींस याजकरितां हा शेरभर चुना तुला यावेळेस खाल्ला पाहिजे. असें म्हणून खाण्यास हुकूम केला. चाकरानें पुष्कळ दिनवणी केली परंतु बादशहा कांहीं केल्यानें ऐकेना शेवटीं निरुपाय झाल्यामुळें त्यानें तो चुना बादशहासमक्ष भक्षण केला. दुसरे दिवशीं तो चाकर आपले कामावर येऊन हजीर झाला तें पाहून बादशहास मोठें आश्चर्य वाटलें. नंतर एका लोणाऱ्यास बोलावून आणून त्याचाकराचे नकळत त्यास सांगितलें कीं, उद्यांसकाळीं तुजकडे आम्हां कडून जो माणूस प्रथम येईल त्याजला तूं उचलून भट्टीत टाकून दे असें सांगून त्यास रजा दिली. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं त्याच चाकरास हुकूम केला कीं, फलाण्या

लोणाऱ्याचे घरीं जाऊन शेरभर चुना घेऊन ये हें ऐकू-
न चाकर निघाला तो बिरबलाचे घरीं आला आणि त्या-
स हें वर्तमान सांगत आहे इतक्यांत इकडे बादशहा-
नें दुसरे चाकरास हुकूम केला कीं, तो चाकर चुना आ-
णावयास लोणारी याचे भटीवर गेला आहे तूं त्याचे
मागून जा आणि लोणारी यानें त्यास भट्टींत टाकिला
किंवा नाहीं हें पाहून ये नें ऐकून तो चाकर लोणारी या-
चे घरीं निघाला तो थेट तेथें जाऊन पोंचला पहिला
चाकर बिरबलाचे घरीं गेल्यामुळें राहून दुसरा पुढें
गेला. तो जातांच लोणारी यानें त्यास उचलून भट्टीं-
न टाकून दिला तो टाकतांच मरण पावला. इकडे चा-
करानें बिरबलास आपलें कालचें वर्तमान कळवि-
लें आणि आज पुनः चुना आणावयास पाठविलें आहे
असें सांगितलें बिरबल म्हणाला कांहीं चिंता नाहीं
अर्धि घटका येथें बैस नंतर लोणारी याचे घरीं जा.
त्याप्रमाणें चाकरानें तेथें अर्धी घटिका घालवून नंत
र लोणारी याचे घरीं गेला आणि त्याज पासून एकशे-
रभर चुना मागून घेऊन बादशहाकडे आला त्यास-

पाहून बादशहा म्हणाला तूं येथून गेल्यावर वाटे-
नें दुसरे कोठें गेला होतास चाकर म्हणाला खावंद
मार्गावर बिरबल साहेब यांचें घर आहे तेथें दारांत
बिरबल साहेब उभे होते त्यानीं हाक मारली म्हणून
त्यांचे घरीं गेलों होतों बादशहा म्हणाला बिरबल
तुज जवळ काय बोलला चाकर म्हणाला त्यानीं वि-
चारलें सरकार स्वारी काय करीत आहेत मी म्हणा
लों तोंड धुवून निमाज पढावयास गेले आहेत. नं-
तर थोडे वेळानें त्यांचा निरोप घेऊन लोणारी याचे
भट्टीवर गेलों आणि शेरभर चुना घेऊन आलों हें ऐ
कून बादशहा आपले मनांत म्हणाला याचें आयु-
ष्य सबळ असतां आपल्याच्यानें याचा नाश कसा
करवेल असा विचार करून त्यास तो गुन्हा माफ क-
रिता झाला. नंतर चाकर बिरबलाचे घरीं जाऊन जा
ऊन त्यास तें सर्व वर्तमान सांगून आपण मजला
वांचविलें असें म्हणून त्याचे पायां पडला.

## गोष्ट ४१ वी.

## दूध भावा विषयीं.

एके दिवशीं बादशहा आपले मुत्सद्दी लोकां सह-वर्तमान यमुनेवर माशांची शिकार करीत व मध रवात बसला होता तेसमयीं बादशहाचा दूधभाऊ करीम नामक होता तो आला आणि बिरबलास विचारूं-लागला कीं, बादशहा काय करीत आहेत, बिरबल म्हणाला बादशाहा झकमारीत व गुरवात बसले आहेत हें दूध भावानें ऐकून त्यास अतिशय क्रोध आला परंतु करतो काय? बिरबलाचें पारिपत्य करण्याचें त्याचे हातांत नाहीं मग तो करीम बादशहा कडे गेला तों त्याची ती क्रोधमुद्रा पाहून बादशहा म्हणाला आज तुझी मुद्रा क्रोधयुक्त कां दिसते दूधभाऊ म्हणाला तुमच्या बिरबलास मी विचारिलें कीं, बादशहा काय करीत आहेत त्यानें सांगितलें बादशहा झकमारीत व गूरवात बसले आहेत याप्रमाणें त्याचे निंदेचे शब्द-ऐकून माझे तळव्याची आग मस्तकांत गेली हें ऐकून बादशहा म्हणाला आपण घरीं गेल्यावर पाहून घेऊं तूं स्वस्थ ऐस असें बोलून त्याचें समाधान केलें नंतर वाड्यांत आल्यावर बिरबलास बोलावून विचा-

रिलें कीं, तूं आमचे दूधभावा जवळ काय बोलला-
स त्याजवरून बिरबलानें सर्व हकीकत सांगितली
ती ऐकून बादशहास राग आला आणि बिरबलास
दरबार बंद केला कांहीं दिवसांनीं बादशहास बिर-
बलाचें काम पडलें म्हणून त्यास बोलावणें पाठवि
लें ते समयीं बिरबलानें एक म्हशीचें रेडकूं आणवू-
न तें आपले पाठीवर बांधिलें आणि त्यासहीत बिर
बल बादशहाचे कचेरीस गेला तेव्हां बादशहा म्ह-
णाला तुला येण्यास इतका उशीर कां लागला बि-
रबल म्हणाला खावंद मी आपल्या दुधभावाचे
कामांत गुंतलों होतों. बादशहा म्हणाला तुझा दु-
ध भाऊ कोठें आहे बिरबल म्हणाला हा पहा मा-
झ्या पाठीवर आहे असें म्हणून तत्काळ सोडून दा-
खविला. त्यास पाहून बादशहा म्हणाला हा काय-
तुझा दूध भाई बिरबल म्हणाला. जितके दूध भा-
ई तितके या प्रमाणें ढोणगेच असतात हें ऐकून बा-
दशहा आपले दूध भावाचे अकलेची परीक्षा मनां-
त आणून बिरबलास येण्याचा हुकूम करिता झा-

ला इसक मारणे म्हणजे मासे मारणें व गू खाणे म्हणजे मध खाणे हे शब्द फारशी मध्यें आहेत.

## गोष्ट ४२वी.

## दोघी शेजारणीची.

दिल्ली शहरांत दोघी स्त्रिया शेजारीं रहात होत्या त्यांत एक चांगली नीतीमान असे व दुसरी दुर्गुणी महा कपटी दुष्ट असे एके दिवशीं त्या दुर्गुणीनें आपलें पोर मारिलें आणि शेजारणीचे न कळत तिचे घरांत टाकिलें आणि बादशहा कडे फिर्याद गेली त्या वेळेस बिरबलानें शेजारणीस बोलावून आणून पोरा विषयीं मजकूर विचारितां ती म्हणाली यांतील मजकूर मजला बिलकूल माहीत नाहीं हें पोर कोणी मारून आणून माझे घरांत टाकिलें हें मी जाणत नाहीं ते समयीं बिरबलानें त्या दोघी रहात होत्या त्यांचे आशीं पाशीं लोक रहात होते त्यांस बोलावून उभय स्त्रियांची चोकशी केली त्यांत सर्वांनीं जिचे घरांत पोर मेलेलें पडलें होतें ती बाई फार कुलीन व पापभीर पवित्र आहे. दुसरी मात्र दुर्गु

णी अती शय वाईट आहे असा गुप्तपणें शोध काढून जिचे घरांत पोर होतें तिजला बिरबल म्हणाला तूं निरापराधी खचीत आहेस तर लुगडें सोडून कचेरींत नग्न उभी रहा ती म्हणाली बिरबल साहेब उद्यां मरण येणार तें आज आलें तरीं हरकत नाहीं परंतु हें निर्लज्य कर्म माझे हातून कधीं ही व्हावयाचें नाहीं तेव्हां बिरबलानें दुसरीस म्हणजे फिर्यादी स्त्रीस बोलावून सांगितलें जर तुझें पोर शेजारणीनें मारिलें ही गोष्ट खरी आहे तर तूं आपलें लुगडें फेडून नग्न उभी रहा तें ऐकून ती स्त्री तात्काळ आपलें लुगडें फेडूं लागली असें पाहून बिरबलानें चाकराहातीं तिजला पलाखती मार दिला तेव्हां आपलें पोर आपण मारून शेजारणीवर विनाकारण आळ घेतल्याचें कबूल झाली. नंतर तिजला यथान्याय बादशहानें शासन करून दुसरीस लुगडें चोळी बक्षीस देऊन मार्गस्थ केली.

## गोष्ट ४३ वी.

## जबरीचे संभोगा विषयी.

एके दिवशीं एक स्त्री बादशहाचे कचेरीस आ-
ली आणि फिर्याद करिती झाली कीं, फलाण्या मनु-
ष्यानें मजवर जुलूम केला तें ऐकून बिरबलानें त्या म-
नुष्यास तात्काळ बोलावून आणून चौकशी करितां
तो म्हणाला बिरबल साहेब ही स्त्री लबाड बोलत
आहे. हिचा माझा कांहीं संबंध नाहीं व हीजी गोष्ट-
मज पासून घडली म्हणते हें सर्व खोटें आहे बिरब-
ल म्हणाला याकामास साक्षीदार नसतात एकांत
असला तरच ही गोष्ट घडून येते आणि तूं इजवर
बलात्कार खचीत केला असशील यास्तव आतांचे
आतां या स्त्रीला पांच रुपये दे तेव्हां तो बिचारा का-
य करतो सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं पांच रु-
पये काढून बिरबला पुढें ठेविले बिरबलानें ते रुप-
ये त्या स्त्रीला देऊन घरीं जाण्यास सांगितलें. नंत-
र थोडे अवकाशानें त्या पुरुषास सांगितलें कीं, त्या
स्त्रीला पांच रुपये दिले आहेत ते तूं तिजला अड-
वून हिसकावून घे रुपये हातीं येण्याकरितां किती
ही श्रम पडले तरीं करून रुपये घेतल्या शिवाय नि

ला सोडूं नको याप्रमाणें बिरबलाची आज्ञा होतांच त्या पुरुषास दुप्पट बळ चढलें आणि धांवत जाऊन त्या स्त्रीला मार्गीन गांठलें आणि रुपये मागूं लागला परंतु ती कांहीं केल्यानें देईना दोघांची रस्त्यांत झटापट होऊं लागली. तेव्हां त्या स्त्रीनें हातांतील रुपये तर सोडले नाहींत पण त्या पुरुषास मात्र घेऊन परत बिरबलाकडे आली आणि म्हणाली बिरबल साहेब आपण मला रुपये देवविले ते मी घेऊन घरीं जात असतां हा मनुष्य दांडगाई करून ते रुपये मज पासून परत घेत होता बिरबल म्हणाला मग तूं रुपये त्यास दिलेस किंवा तुजपाशींच आहेत स्त्री म्हणाली रुपये घेण्या करितां त्यानें पुष्कळ खटपट केली परंतु मी त्याजला एकही रुपया घेऊं दिला नाहीं. हे पहा पांच रुपये मजपाशींच आहेत हें ऐकून बिरबल म्हणाला पांच रुपये तुज पासून या पुरुषाच्या नें घेववले नाहींत तो तुजवर बलात्कार कसा करील तूं कशी करूं देशील त्यावरून तूं लबाड बोलतेस त्याचे रुपये त्याला परत दे-

ते समयीं तो निरुपाय होऊन तिनें रुपये परत दिले नंतर बिरबलानें तिजला शासन करितांच ती त्या पुरुषावर तुफान घेतल्या बद्दल कबूलीस आली नंतर बिरबलानें तिजला यथान्याय शासन केलें.

## गोष्ट ४४ वी.

## पैक्याचे पिशवी विषयी.

एका गृहस्थाच्या घरांतून पैक्याची पिशवी घरांतले घरांत चोरीस गेली. तेव्हां घर धन्यानें पुष्कळ तपास केला परंतु कांहींच पत्ता लागत नाहीं असें पाहून बादशहाचे दरबारास फिर्याद घेऊन आला ते समयीं बिरबलानें त्याचे घरचीं सर्व चाकर माणसें बोलावून आणून निरनिराळीं उभीं केलीं आणि प्रत्येकाचे जवळ एकसारख्या मापाची एक एक काडी दिली. आणि प्रत्येकास सांगितलें कीं, यांतून जो चोर आहे त्याची काडी रात्रीमध्यें एक बोटभर लांब होईल याप्रमाणें सांगून निरनिराळे जाग्यांत त्या सर्वांस कोंडून ठेविलें तेव्हां त्यांत जो चोर होता त्यानें विचार केला कीं, आपली काडी एक बोट लांब होणार आहे

त्या पेक्षां बोटभर तोडून टाकली म्हणजे सर्वांचे बरोबर आपली काडी भरेल मग आपणावर चोरी येणार नाहीं असा विचार करून एक बोटभर काडी तोडून टाकिली. दुसरे दिवशीं दरबार भरला ते समयीं सर्वांस बिरबलानें आपले समक्ष आणवून सर्वांच्या काड्या तपासूं लागला तों जो चोर होता त्याची काडी बोटभर कमी भरली तेव्हां हा चोर आहे असें समजून बाकीच्यांस सोडून दिलें आणि त्याजला मार देतांच त्यानें कबूल होऊन पिशवी पुरून ठेविली होती ती आणून बिरबलाजवळ हजीर केली नंतर पिशवी बिरबलानें फिर्यादीस दिली आणि चोरास यथान्याय शासन केलें.

## गोष्ट ४५ वी.

## लालाचे अभिलाषाची.

दिल्ली शहरानजीकचे एके खेड्यांत माधवराव व रामराव असे दोघे बंधु रहात होते त्यांचा प्रपंच मोठा असल्यामुळें पैशाची तूट आली घरांत माणसांचे खाण्या पिण्याचे फार हाल होऊं लागले यामुळें

उभयतां बंधूनीं विचार करून कोठें तरीं दूरदेशीं रो-
जगार धंदा पहावा आणि द्रव्य संपादन करावें असा
बेत करून उभयतां प्रवासास निघाले ते शंभर स-
वाशें कोस निघोन गेले. वाटेनें धाकटा भाऊ जो रा-
मराव त्यास एक पडशी सांपडली ती सोडून पाहि-
ह्ली तों त्यांत पन्नास हजार रुपये किमतीचें जवा-
हीर व दोन लाल असें द्रव्य होतें तें घेऊन वडील भा-
ऊपुढें गेला होता त्यास जाऊन गांठलें आणि मिळा-
लेलें द्रव्य त्यास दाखविलें तें पाहून माधवराव म्ह-
णाला फार उत्तम झालें आतां तूं हें घेऊन घरीं जा-
आणि थोडे बहूत द्रव्याची मोड तोड करून प्रपंच
चालीव मी पुढें जातों रामराव म्हणाला जें द्रव्य मि-
ळालें आहे यांतून अर्धे तुला देतों हें घेऊन आपण
उभयतां घरीं जाऊं चल. तेव्हां माधव राव म्हणाला
केवळ द्रव्याकरितांच मी बाहेर जातों असें नाहीं
एकवेळ घरांतून पाय सुटला आहे तो पुनः घरी
गेल्यावर बाहेर जाणें होणार नाहीं देशोदेशीं फिर-
लें असतां नानाप्रकारचीं माणसें नर्शानें नाना प्र-

कारनीं जनावरें, पक्षी, देश, वनस्पती, नद्या, पर्वत वगैरे दृष्टीस पडतात व त्या योगानें नाना देशच्या भाषा येतात. यास्तव द्रव्य मिळेल तितकें मिळवून देश पहाणें ही होईल. आतां हें द्रव्य तूं घरीं घेऊन गेलास म्हणजे घराकडील काळजी मला बिलकूल राहणार नाहीं. तीर्थरूप मातोश्री फार वृद्ध झाली आहेत त्यांची ही शुश्रुषा तूं परत घरीं गेल्यानें राहील यास्तव हें द्रव्य घेऊन घरीं जा आणि दोन लाल आहेत त्या पैकीं एक तूं मजला देत असलास तर तो नेऊन माझे बायकोचे स्वाधीन कर आणि दुसरें सर्व द्रव्य प्रापंचास लागेल तें खर्च करून बाकी शिलक राहील त्याची वांटणी मी घरीं येईन त्या वेळेस करूं असें सांगोन रामरावास घराकडे मार्गस्त केलें आणि आपण पुढें चालता झाला. इकडे रामराव मजल दरमजल करीत गांवीं आला आणि भावजई जवळ लाल न देतां आपले जवळच ठेविले आणि प्रापंचास लागेल तें द्रव्य जवाहीर विकून मोकळें केलें आणि आनंदानें सर्व मनुष्यां

चें पोषण करूं लागला. कांहीं दिवसांनीं माधवराव देशांतराहून घरीं आला आणि आपले बायकोस लाला विषयीं विचारूं लागला तों तिणें सांगितलें कीं, रामराव भावोजीनीं मज जवळ लाल दिला नाहीं. तेव्हां रामरावास विचारितां त्यास लोभ उत्पन्न होऊन लटकेंच तुफान घेऊन भावजई जवळ लाल दिला तिणें आपले माहेरीं कदाचित् नेऊन पोंचविला असेल आणि तुह्मां जवळ नाहीं ह्मणत असेल तर कोण जाणें तें ऐकून माधवराव यानें आपलेबायकोस नाना प्रकारें विचारिलें परंतु कबूल होईना. शेवटीं तिजला ताडण ही केलें तरी लाल मिळेना तेव्हां माधवराव बादशहाकडे गेला आणि झालेली हकीकत कळविली ते समयीं बिरबलानें त्याचे भावास व बायकोस बोलावून आणून विचारितां कोणीच कबूल नाहीं शेवटीं बिरबलानें रामराव यास विचारिलें कीं, तूं इजपाशीं लाल दिलास ते वेळेस जवळ कोणी होतें. रामराव ह्मणाला ही बायको माणूस कदाचित नाकबुलीस जाईल

म्हणून दोन साक्षीदारांचे समक्ष इजला लाल दिला ते पाहिजे तर हजर करितों हें ऐकून त्या साक्षीदारांस बिरबलानें आपले समक्ष आणविलें आणि विचारितां उभयतांनीं ही सांगितलें कीं, आमचे समक्ष रामराव यानें आपले भावजईचे हवालीं एक लाल केला ते समयीं बिरबल त्या स्त्रीस म्हणाला तुझे साक्षीदार आहेत काय ती म्हणाली बिरबल साहेब माझा साक्षीदार एक परमेश्वर आहे त्या खेरीज दुसरा कोणी नाहीं तेव्हां बिरबलानें दोघे बंधू व दोघे साक्षीदार आणि ती स्त्री अशीं पांच माणसें निरनिराळे खोलींत कोंडून ठेविलीं आणि प्रत्येका जवळ पावशेर पावशेर मेण दिलें आणि जेवढा लाल होता तेवढे आकृतीची मेणाची गोळी करून द्यावी असें सांगितलें ते समयीं चौघांनीं मेणाच्या गोळ्या करून दिल्या स्त्रीनें लाल कधींच पाहिला नवता यास्तव तिनें तें मेण तसेंच हजर केलें ते समयीं बिरबल त्या स्त्रीस म्हणाला तुझी गोळी कोठें आहे ती म्हणाली महाराज मी आपले जन्मांत लाल कसा-

असतो तो मुळींच पाहिला नाहीं यामुळें मजला गोळी केवढी करावी हें माहीत नाहीं. नंतर चौघांच्या गोळ्या हातांत घेतल्या त्या दोघां भावांच्या मात्र एकसारख्या मिळाल्या कारण त्यांनीं लाल पाहिले होते दोघे साक्षीदार यानीं मुळींच लाल कसा असतो तो पाहिला नवता यामुळें एकानें सुपारी एवढी गोळी केली. दुसऱ्यानें लिंबा एवढी केली तें पाहून बिरबलानें जाणिलें कीं, बाई निरापराधी असोन साक्षीदार यानीं खोट्या साक्षी दिल्या व लाल रामरावा जवळच आहे असें समजून रामराव यास दूनां कडून ताडन करविलें ते समयीं रामराव कबूलीस येऊन दोनलाल काढून बिरबलाचे स्वाधीन केले नंतर बिरबलानें एक लाल माधवराव यास दिला व दुसरा सरकारचे जामदार खान्यांत पाठवून दिला आणि त्रिवर्गांस योग्य शासन केलें.

## गोष्ट ४६ वी.

## बादशहास ठकविण्याची.

एके दिवशीं एक अक्कलवान मनुष्य बादशहास

ठकवावें या हेतूनें दोन पक्षी व एक ससा असे ती-
न जिवंत प्राणी घेऊन बादशहाचे वाड्याजवळ
खिडकी खालीं उभा राहिला त्याला पाहून बादश
हा म्हणाला येथें कां उभा राहिलास तो म्हणाला
खुदावंत त्यातीन प्राण्याचीं मी खावंदांचे नावावर
पैज लाविली होती त्यांत हे आले आहेत यास्तव ते
घेऊन आलों आहें. बादशहा म्हणाला बरें आहे जा
मुदपाकांत नेऊन दे असें सांगतांच त्याप्रमाणें नेऊ-
न दिले. दुसरे दिवशीं एक हरण अति उत्तम तरु-
ण व मासाळु असें घेऊन पूर्ववत खिडकी खालीं-
येऊन उभा राहिला बादशहानें त्यास पाहून विचा-
रिलें कीं, आज कां उभा राहिलास ते समयीं तो म्ह-
णाला खावंदांचे नांवावर हरणाची पैज मारली-
होती ती जिंकली तो हा हरण घेऊन आलों आहें
बादशहानें हरण पाहून खुष झाला आणि त्यास
म्हणाला कालचे प्रमाणें मुदपाकांत नेऊन दे ते-
व्हां त्याणे तात्काळ तो हरण मुदपाकांत नेऊन दि-
ला. तिसरे दिवशीं एक उत्तम प्रकारचा मासळ मे-

दा घेऊन खिडकी खालीं उभा राहिला त्यास पाहून-बादशहानें विचारिलें आज कां उभा राहिलास त्या-नें पूर्ववत पैंजेचा प्रकार सांगितला. तेव्हां बादश-हाचें हुकुमावरून तो मेंढा मुदपाकांत नेऊन हजी-र केला. नंतर दोन तीन दिवस गेल्यावर एके दिव-शीं एक मित्र मनुष्य बरोबर घेऊन पुनः खिडकीखा-लीं उभा राहिला त्यास बादशहानें पाहून आज कां-हीं तरीं आणिलें असेल असें समजून म्हणाला आ-ज कां उभा राहिलास तो म्हणाला खुदावंत हाजो-माझे जवळ माणूस उभा आहे त्याज बरोबर मी पांच-हजार रुपयांची खावंदाचे नावावर पैंज मारली ती-मी हरलों सबब ते रुपये घेण्या करितां या मनुष्याची मजला तसदी बहूत लागली आहे म्हणून कदमापा-शीं हजीर झालों आहें असें ऐकून बादशहानें विचा-र केला कीं, यानें तीन रोज आपले नांवावर पैंजा मा-रल्या त्यांत मिळाले त्या जिनसा आपल्यास आणू-न दिल्या. आजची पैंज तो हरला त्यापेक्षां पांच ह-जार रुपये देणें भाग आहेत असा विचार करून

जामदार खान्यावर रुपये देण्याविषयीं हुकूम केला आणि त्या मनुष्यास सांगितलें कीं, आतां यापुढें तूं आमचे नांवावर पैज मारूं नको असें सांगून त्यास मार्गस्त केलें या प्रमाणें त्या धूर्त ठकानें बादशहास ठकवून पांच हजार रुपये घेऊन गेला.

## गोष्ट ८७ वी.

## आंगाचें मास कापून घेण्याविषयीं.

दिल्ली शहरांत भानुदास नांवाचा सावकार रहात असे त्याचें बहुतां दिवसांचें हुंडीचें दुकान होतें एके दिवशीं त्याजवर चहूं मुलखांतून कोट्यावधी रुपयांच्या दर्शनी हुंड्या येऊन लागल्या आणि बाहेरील लाहणे यावयाचें तें दूरदेशच्या हुंड्या असल्या मुळें वक्तशीर येऊन पोंचलें नाहीं आणि हुंड्यांचा ऐवज तर घेण्यास तर लोक येऊन बसले. शिलक पहातां सर्व हुंड्यांचा ऐवज देण्यास पंधरा लक्ष रुपये कमी आहेत तेव्हां कोठून तरीं ऐवज आणून लोकांची भरती केली पाहिजे असा विचार करून आलेले लोकांस अनुक्रमें पैसा देण्या-

चें गुमास्त्या कडून काम चालविलें आणि आपण ऐवज आणावयास शहरांत गेला. परंतु एवढी मोठी रक्कम मिळण्या जोगें एक डोंबाजी शेट मारवाडी याचें दुकान होतें परंतु तो फारच बाड निर्दय व दुष्ट असा होता त्याजपाशीं ऐवज मागण्यास जाणें भाग पडलें म्हणून भानुदास सावकार डोंबाजीचे दुकानीं गेला. आणि आपली हकीकत त्यास कळवून पंधरा लक्ष रुपये पंधरादिवसांचे मुदतीनें द्यावें व्याज व मनोती थोडी जास्त घेतली तरी देईन परंतु यावेळेस रुपये दिले पाहिजेत हें ऐकून डोंबाजीनें विचार केला कीं, संधी बरीच सांपडली आहे एवढा भानुदास मारून टाकिला म्हणजे आपला हुंडीचा व्यापार उत्तम प्रकारें चालेल कारण भानुदास याजला पोटीं संतान नवतें तो मरण पावला म्हणजे अर्थातच त्याचें दुकान बंद होईल कदाचीत त्यास आपण रुपये न दिले तरी हा पतीवान आहे एकजागीं न मिळाले तर दाहा ठिकाणाहून ऐवज आणून हुंड्यांची भरती करील त्यापेक्षां आपण अटीनें

रुपये द्यावे हें बरें असा विचार करून त्यास म्हणा-
ला शेट साहेब आपण कधीं नवन ऐवज मागावया-
स आलां तर तुह्यांपासून व्याज व मनोती घ्यावी हें
मला ठीक दिसत नाहीं यास्तव आपल्यास दहा दि-
वसांचे मुदतीनें ऐवज देतों परंतु दहा दिवसांत ऐ-
वज परत न केल्यास पंधरा लक्षां बद्दल आपले-
आंगाचें एक शेर मांस मी आपले हातानें पाहिजे
त्या ठिकाणचें कापून घेईन. हें ऐकून भानुदासास
मोठें संकट पडलें परंतु निरुपाय असल्यामुळें क-
बूल करणें प्राप्त झालें तेव्हां त्याप्रमाणें करार लिहू-
न देऊन पंधरा लक्ष रुपये घेऊन आपले दुकानीं नि-
घून गेला आणि सर्व हुंड्यांचा ऐवज लोकांस देऊ-
न मार्गस्त केलें. नंतर दोन दिवस गेले तों भानुदा-
स सावकाराचे प्रकृतीस कांहीं विशेष आजार उ-
त्पन्न झाल्यामुळें डोंबाजीचे मुदतीचें स्मरण न र-
हातां मुदत भरून गेली व त्या मुदतींत बाहेरील
ऐवज ही आला नाहीं व डोंबाजीकडून शेरभर मां-
स मागण्याचा तगादा आला ते समयीं भानुदासा-

नें इकडून तिकडून पंधरा लक्ष रुपये गोळा करून डों बाजीनें दुकानावर पाठवून दिले ते डोंबाजीनें न घे- तां परत केले आणि एकशेर मांस घेईन रुपये घेणा- र नाहीं असा निरोप पाठविला तेव्हां भानुदास अत्यं- त काळजींत पडला कांहीं सुचेनासें झालें व या- काळजीनें त्याचें दुखणे ही जास्त होत चाललें इक- डे डोंबाजीनें काजी कडे एकशेर भर मास कापून घे- ण्याची भानुदासावर फिर्याद केली ते समयीं काजी कडून बोलावणें आलें तेव्हां जाणें भाग पडल्या मु- ळें मोठे संकटानें जाऊन काजी कडे हजर झाला तेव्हां काजी म्हणाला तुमचा करार मुदती नंतर तुमचे अं- गचें एकशेर मांस डोबाजीस देण्याचा करार खरा- आहे किंवा नाहीं भानुदास म्हणाला करार खरा आ- हे परंतु मी त्याचें व्याजा सुद्धां रुपये द्यावयासं कबू- ल आहें व रुपये त्याचे दुकानावर पाठविले असतां त्यानें घेतले नाहींत परत केले आणि मांस मागत आहे या गोष्टीचा विचार सरकारांनीं करावा आ- णि योग्य वाटेल तो हुकूम करावा. काजी म्हणाला

हुकूम करण्याचें आह्मांकडे कांहींच राहिलें नाहीं तुमचे करारानेंच न्याय केला आहे त्यापेक्षां तुमचे आंगाचें एक शेर मांस डोंबाजीचे मर्जीस येईल त्या जागचें तो आपले हातानें कापून घेईल असा आम्हीं हुकूम करितों हें ऐकून भानुदास फार भयाभीत जहाला परंतु विचारानें धैर्य धरून काजीस म्हणाला ठीक आहे परंतु मी बादशहाकडे विनंती करणार आहें यास्तव निकडील हुकूम होई पर्यंत मांस कापून देण्याची महकुबी जाहली पाहिजे;- काजी म्हणाला फार बरें आहे. एक महिन्यांत तुम्हीं आपले कामाचा बादशहा कडून निकाल करून घ्यावा नाहीं पेक्षां एकमहिन्यानें मांस कापून देववलें जाईल. नंतर भानुदास काजीची रजा घेऊन घरीं आला आणि दुसरे दिवशीं बादशहा कडे विनंती करावयास गेला ते समयीं बादशहानें तो त्याचा मजकूर ऐकून फार विस्मयांत पडला व त्या शहरांत मोठा नगरशेट सावकार कायतो भानुदासच होता व दुकान ही पांचशें वर्षांचें जुनें नेहेमी सर-

कारचे उपयोगीं पडणारा व कोटयावधी रुपये त्यांनं सरकारांत येणें देणें झालेलें तेव्हां कोणते ही युक्ती नें अन्याय होऊं न देतां भानुदासास बचाविलें पाहिजे असा विचार करून तें काम बिरबलाकडे द्यावें म्हणजे तो बुद्धिवान् असल्या मुळें कांहीं तरी युक्ति काढील असा विचार करून भानुदासास हुकूम केला कीं, या गोष्टीचा आह्मी विचार करितों या वेळेस तुह्मीं आपले घरीं जावें आणि बोलावणें होईल तेव्हां यावें मध्यंतरीं दरबारास येण्याची तसदी घेऊं नये हें ऐकून भानुदासास थोडा भरंवसा आला कीं आपणा विषयीं बादशहाचे मनांत दया आहे म्हणून दरबारास येण्याची तसदी घेऊं नये-असें इनमामाचें बोलणें त्याचे मुखांतून निघालें. या मुळें मनास आनंद वाटून घरीं येता झाला. •

दुसरे दिवशीं बिरबल दरबारास येतांच भानुदासा विषयींचा मजकूर त्यास सांगून अन्याय न होतां भानुदासाचा बचाव करण्याची युक्ती काढावी. असा हुकूम होतांच बिरबल म्हणाला फार उत्तम आहे तंतर

दोन चार दिवस गेल्यावर डोंबाजी बादशहाकडे गेला आणि भानुदासाचा करार पुरा करून देववावा अशी विनंती केली ते समयीं बादशहा म्हणाला काय हो बिरबल हा मारवाडी काय म्हणतो तें याचें ऐका बिरबल म्हणाला सर्व ऐकिलें सरकारचे आज्ञेचीच वाट पहात होतों आज्ञा झाली असतां उशीर नाहीं असें म्हणून भानुदासास बोलावून आणविलें आणि डोंबाजीस सांगितलें काय शेटजी तुह्मांस रुपये घेणें नाहींत रुपयांचे ऐवजीं याचे आंगाचें मांसच पाहिजे ना डोंबाजी म्हणाला होय, बिरबल म्हणाला ठीक आहे भानुदासाचे आंगाचें मांस एकशेर तुझे इच्छेस येईल त्या जागचें तूं आपले हातानें कापून घ्यावें असा त्याचा व तुझा करार आहे त्याप्रमाणें तें मांस काजीनें देवविण्या विषयीं हुकूम केला तोच हुकूम बादशाही दरबारांत पसंत पडला आहे यास्तव या वेळेस भानुदासाचें आंगाचें मांस तुझे कराराप्रमाणें कापून घे परंतु जर करितां कापलेला मांसाचा तुकडा एकशेरांत उणा किंवा अधीक भ-

रला तर तुझा व तुझे कुटुंबांतील सर्व माणसांचा शिरश्छेद केला जाईल व तुझी सर्व संपत्ती सरकार जमेस होईल हें ऐकून डोंबाजी घाबरला आणि पुढें काय करावें म्हणून विचार करूं लागला. परंतु कांहीं सुचेना. इकडे बिरबलानें तर निकड लाविली ते समयीं डोंबाजी म्हणाला बिरबल साहेब मला मांस नको माझे पंधरा लक्ष रुपये व्याज व मनोती सहीत द्यावे म्हणजे बस आहे बिरबल म्हणाला रुपये भानुदासानें पाठविले असोन ते तूं घेतले नाहींस म्हणून आतां तुला रुपये मिळणार नाहींत मांसच घेतलें पाहिजे आणि तें जर यावेळेस न घेशील तर पुढें मिळणार नाहीं व सरकारचा हुकूम अमान्य केल्या बद्दल पंचवीस लक्ष रुपये गुन्हेगारी बद्दल द्यावे लागतील काय करतोस तें बोल लवकर हें ऐकून बादशहास मोठा आनंद झाला ते समयीं डोंबाजी परम संकटांत पडून गुन्हेगारी बद्दल पंचवीस लक्ष रुपये सरकारांत दिण्यास कबूल झाला आणि तेच वेळेस आणून

दिलें आणि बिरबलाची रजा घेऊन घरीं गेला बादशहानें भानुदास पतीचा ग्रहस्थ हुंडीचे रुपये भरण्या करितां त्याणें सावकारास आंगाचें मांस कापून देण्यास राजी झाला. त्यापेक्षां याचेसारखा पतीवान माणूस आपले शहरांत एकही नसेल असें मनांत आणून त्याच वेळेस भानुदासास पोषाख देऊन संतोषानें घरीं जावयास रजा दिली व जे डोंबाजी कडून गुन्हेगारी बद्दल पंचवीस लक्ष रुपये आले होते ते बिरबलास इनाम करून दरबार बरखास्त करिता झाला.

## गोष्ट ४८वी.

### झक मारणें व च्यूत चारणें याविषयीं.

एके दिवशीं बादशहा नदीतीरीं आंबे खात व माशांची शिकार करीत बसला होता त्या समयीं बिरबल ही समागमें आला होता परंतु त्याजला दुसरें कांहीं जरूरीचें काम होतें म्हणून बादशहाची रजा घेऊन घोड्यावर बसून आपले घरीं जात असतां बादशहाचे पदरचा मोठा यवन सरदार त्यास भेटला

तेव्हां त्यानें बिरबलास विचारिलें बादशहा काय करीत आहे बिरबल म्हणाला बादशहा च्यूत चाटीत व इशक मारीत असले आहेत हें ऐकून त्या सरदारास मोठा विस्मय जाहला आणि मनांत म्हणतो काय ब्राह्मणाची जात मार्जारी आहे आमचा बादशहा भोळा असलें माणसास बादशहानें केवळ नाकचा बाल करून ठेविला आहे कांहीं चिंता नाहीं हा मजकूर आपण बादशहाचे कानावर घालून बिरबलाची खोड मोडून टाकली पाहिजे असा मनसोबा करून जेथें बादशहा बसला होता तेथें आला आणि आदब बजावून बादशहास मुजरा केला. बादशहानेंही त्याचें योग्यते प्रमाणें त्यास मान देऊन जवळ बसविलें आणि क्षेम कुशल पुशिलें तें मांगून विनंती करिता झाला कीं, खुदावंद आपला बिरबल काय मार्जारी आहे आतां मला वाटेनें भेटला त्याजला मी सहज रीत्या विचारिलें कीं, बादशहाची स्वारी काय करीत आहेत तो म्हणाला बादशहा च्यूत चाटीत

व झकमारीत बसले आहेत या प्रमाणें त्यानें मज पाशीं सरकारची निंदा केली ती ऐकून माझे सर्वांगा ची आग झाली. परंतु तो पडला बिरबल दुसरा-तिसरा कोणी असता तर त्याच वेळेस या समशे-रानें त्याचे तुकडे करून टाकिले असते या प्रमा-णें ते त्या सरदाराचें रागाचें बोलणें ऐकून बाद-शहास राग आला नंतर शहरांत येतांच बिरब-लास बोलावून आणविलें आणि विचारीलें कीं, सरदाराजवळ आह्मास बेअदबीचीं भाषणें काय बोललास बिरबलानें हात जोडून विनंती केली कीं, जर कोणी खावंदांचे निंदेचीं अक्षरें मुखावाटें बाहे-र काढील आणि माझे कानीं पडतील तर त्याच वेळे-स त्याची जीभ कापून टाकीन तो मीच कशी खावं-दांची बेअदबी करीन झकमारीत म्हणजे माशांची शिकार करीत व च्युत खात म्हणजे आंबे खात बस-ले आहेत हें तर आपल्यास विदितच आहे परंतु मा-झे दुर्दैवानें सरकारचे लक्षांत आलें नाहीं म्हणून रा-ग आला असावा हें ऐकून बादशहा समाधान पावला.

## गोष्ट ४९ वी.

### जारपुरुषास धरण्या विषयीं.

एके दिवशीं एक मनुष्य बादशहाकडे येऊन म्हणाला महाराज कोणी एक मनुष्य दररोज रात्रीस माझे घरीं येऊन माझे बायकोशीं जारकर्म करून जातो त्याला पकडावें म्हणून मी बहुत वेळा यत्न केला परंतु तो मजपेक्षां बळकट असल्यामुळें माझ्यानें धरला जात नाहीं यास्तव सरकार मेहरबान होऊन त्या पुरुषास पकडून योग्य शासन केलें पाहिजे हें ऐकून बादशहानें अति उत्तम व विशेष मोलाचें असें उंची अत्तराची कुपी आणून त्याचे स्वाधीन केली. आणि सांगितलें कीं, ही कुपी नेऊन तूं आपले बायको जवळ दे आणि तिला अशी ताकीद कर कीं, ही कुपी फार जपून ठेव यांतील एक बिंदुही कोणास देऊं नको. तेव्हां तो मनुष्य कुपी घेऊन घरीं आला आणि बादशहाचे हुकुमा प्रमाणें बायको जवळ कुपी देऊन तिजला ताकीद केली. इकडे बादशहानें चार हेरांस बोलावून आणून तें अत्तर त्यांस दाखविलें आणि आज्ञा

केली कीं, फलाण्या मनुष्याचे घरा नजीक चार बाजूस चौघांनीं उभें रहावें व त्या घरांतून माणूस निघेल आणि ज्या अत्तराचा वास ज्याचे आंगास येईल त्याजला पकडून आणून हजीर करावा. त्याप्रमाणें ते हेर त्या कामास गेले रात्रो तो जार पुरुष नित्याप्रमाणें त्या घरांत गेला ते समयीं ती स्त्री त्यास म्हणाली काय सांगावें माझे भ्रतारानें एक अतिउत्तम अत्तराची कुपी आणून मज जवळ देऊन सांगितलें कीं, यांतील एक बिंदु देखील कोणास देऊं नको परंतु अशी जिन्नस हातीं आली असोन आपले जिवलगास माझ्यानें कशी न देववेल तर तें अत्तर तुमचे आंगास लावितें मग भ्रतार कांहीं का करीना - असें म्हणून ती कुपी उघडून त्याचे आंगास तें अत्तर लाविलें नंतर नित्यक्रमाप्रमाणें कामकाज आटपून तो लुच्चा घरांतून निघून चालला तों हेरास अत्तराचा वास आला तेव्हां त्याणें त्यास तात्काळ पकडला आणि राजवाड्यांत घेऊन आला व चौकीदाराचे स्वाधीन केला. प्रातःकाळीं त्याजला बादशहा

पुढें नेऊन उभा केला ते समयीं बादशहानें त्या पुरुषास बोलावून सांगितलें कीं, तुझा अपराधी धरून आणिला आहे तर तुला जसें पाहिजे तसें याचें पारिपत्य कर ते समयीं त्या पुरुषानें बादशहास विनंती केली कीं, माझी बायको व हा पुरुष असे दोन्ही अपराधी आहेत यास्तव दोघांस ही योग्य शासन सरकारानीं केलें पाहिजे तेव्हां बादशहानें त्याचे बायकोस धरून आणविली आणि त्या दोघांस एकमेकांनें मूत एकमेकांस याप्रमाणें एक महिनाभर पाजविण्याचा हुकूम केला आणि महिन्यानंतर दोघांस गुलामगिरीचे कामावर जन्मपर्यंत रहाण्याचा हुकूम केला. व त्या जार पुरुषाचें घरदार लुटून आणवून तो सर्व ऐवज त्या पुरुषास देवविला. नंतर त्यानें दुसरें लग्न करून प्रापंच करिता झाला. या प्रमाणें पूर्वीं जार कर्माचा तलास व शासन करीत असत म्हणून जारकर्म सहसा होत नसे.

## गोष्ट ५० वी.

## काफर गृहस्थानें कवीस ठकविण्याची.

एके दिवशीं एक कवी एका श्रीमान् गृहस्थाचे घरीं गेला आणि त्यास वंदन करून त्याचेजवळ बसला थोडके वेळांत त्या कवीनें श्रीमान् गृहस्थावर स्तुतिपर कांहीं कविता केली आणि त्यास ती म्हणून दाखविली. नंतर कांहीं वेळानें घरीं जाण्या करितां कवी त्याची रजा मागूं लागला. तेव्हां हा श्रीमान् गृहस्थ अतीशय काफर कोणास छदाम द्यावयाचा नाहीं परंतु कऱ्हाडे ब्राह्मणा सारखा मिट्ठा ठकपणाचा आदर करणारा होता. तो कवीस म्हणाला महाराज आपली संभावना उत्तम प्रकारें करावी असा माझे मनांतील विचार होता परंतु आज माझे जवळ कांहीं नाहीं आपण कृपाकरून उदईक यावें म्हणजे आपली संभावना करीन हें ऐकून तो कवी आनंदानें आपले बिऱ्हाडीं निघोन गेला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं उठोन पुनः त्या काफराचे घरीं आला. त्यास पाहून काफरानें विचारिलें तुह्मीं कोण कोठून आलां व कोठें जातां आणि येथें येण्याचें कारण काय? कवी म्हणाला मी कवी काल आलों होतों आ

पण उद्यां या म्हणून सांगितलें होतें म्हणून आलों आहें तो म्हणाला तुह्मीं कवी आहां परंतु तुह्मांस तारतम्य ज्ञान मुळींच नाहीं. काल तुह्मीं कविता करून शब्दालंकारानें माझें मन संतुष्ट केलें तो तुमचा उपकार जर मी फेडला नाहीं तर कृतघ्नता मजकडेस येईल म्हणून मीही शब्दालंकारानें तुह्मांस उद्यां या म्हणजे तुमची संभावना करीन असें म्हटलें ती गोष्ट कालची काल फिटली गेली आज तुमची बाकी मजकडे काय राहिली आहे यास्तव स्मरेवं करून आपले कामास चालते व्हावें हें ऐकून कवी उगेंच चालता झाला.

## गोष्ट ५१ वी.

## विश्वासघातकी मित्रा विषयीं

दिल्ली शहरांत विश्वासराव नांवाचा गृहस्थ रहात होता तो तीर्थ यात्रेस कुटुंबाचे मनुष्यां सहित जाण्यास निघाला तें समयीं घरदार इस्टेट पैसा-अडका असें सर्व आपला जो मित्र येसाजी राव याचे स्वाधीन केलें आणि निघोन गेला. तो तीर्थ यात्रा

करितां करितां बारा पंधरा वर्षे तिकडेच लोटलीं. उपरांत घरीं आला तों फक्त घरमात्र आहे आंतची जवस्त भांडें कुंडे वगैरे कांहीं नाहीं तेव्हां एसाजी राव याचे घरीं गेला आणि आपण आल्याचा मजकूर कळवून आपली जिनगी मागूं लागला ते समयीं एसाजी रावास लोभ उत्पन्न झाल्यामुळें त्यास म्हणाला तुझी जिनगी मला कांहीं माहीत नाहीं. जिकडे ठेविली असशील तिकडे पहा जा तेव्हां विश्वास राव म्हणाला तुजपाशीं दिली म्हणून तुला मागत आहें एसाजी राव म्हणाला मला माहीत नाहीं आल्या मार्गानें चालता हो नाहीं पेक्षां चाकराहातीं धक्के मारवून घालवून देईन हें ऐकून विश्वासराव यास आश्चर्य, खेद आणि चिंता अशी एकदम प्राप्त झाली. नंतर थोडे वेळानें विचार करून त्यास म्हणाला अरे तूं माझा जिवलग मित्र म्हणून सर्व दौलत तुझे स्वाधीन करून तीर्थ यात्रेस गेलों असें असतां तुला परमेश्वरानें अशी बुद्धी कां दिली. तर यावेळेस मी जातों तूं आपले मनांत सुविचार

करून माझें मला दे विश्वास घाताचें पातक मस्त-
कावर घेऊं नको असें म्हणून निघोन आला नंतर
आपले मनांत विचार करिता झाला कीं, आपले ज-
वळ कागदपत्र कांहीं नाहीं व जिनगी स्वाधीन के-
ल्या बद्दल साक्षीदार ही कोणी नाहींत तेव्हां सरका-
रांत फिर्याद जाऊन तरीं काय होणार परंतु बिरब-
ल आपल्यास चांगले प्रकारें ओळखतो त्याजक-
डे जाऊन त्याजला आपली हकीकत कळवावी म्ह-
णजे तो चतुर आहे एखादी युक्ति काढून आपलें
काम करील असा विचार करून बिरबला कडे गे-
ला. आणि आपण तीर्थयात्रे हून आल्याचा मज-
कूर सांगोन झालेलें मित्रा विषयींचें वर्तमान विदि-
त केलें तें ऐकून बिरबल म्हणाला ठीक आहे तूं
परवांचे दिवशीं सकाळीं ये म्हणजे तुला युक्ती सां-
गेन असें सांगून त्यास मार्गस्त केलें. नंतर दुसरे
दिवशीं येसाजी राव यास बोलावून आणून त्या-
चें आगत स्वागत करून एकांतीं त्यास विचारिता
झाला कीं, हाल्लीं मजला कामें बहूत आहेत आणि

न्यायाधिशीचें हीं काम बादशहानें मजकडे सांगि
तलें आहे या मुळें तें काम करून दुसरे कामास फुर
सत होत नाहीं यास्तव दुसरा कोणी तरी न्यायाधिशी
चे कामावर नेमण्या विषयीं बादशहाचा हुकूम मि-
ळाला आहे याजकरितां माझे मनांत तें काम तुह्मां-
स सांगावें असें आहे. परंतु तुह्मीं कबूल केल्यास-
बादशहाचे कानावर घालून तुमची नेमणूक करण्या
चा हुकूम घेईन हें ऐकून एसाजी राव आपले मनां-
त फार खुष होऊन तें काम मी करावयास राजी
आहें असें सांगता झाला. तें ऐकून बिरबल म्ह-
णाला फार उत्तम आहे संधी पाहून सरकारचे का-
नावर घालतों नंतर तुह्मांस बोलावीन तेव्हां या
असें सांगून त्यास मार्गस्थ केला. नंतर दुसरे दि-
वशीं विश्वासराव आला त्यास तो मजकूर सांगू-
न एसाजीरावाकडे आपली चीज वस्त मागावया-
स जाण्यास सांगितलें आणि तो न देईल तर बाद-
शहांकडे फिर्याद जातों असें बोल म्हणजे तो तु-
झी सर्व जिनगी तुला देईल असें सांगून त्याजला

लावून दिला. नंतर तो विश्वासराव एसाजीरावाकडे गेला आणि त्यास म्हणाला मी बादशहाकडे फिर्याद करणार होतों परंतु तूं माझा जिवलग मित्र आहेस म्हणून पुनः तुजकडे आलों आहें तर अभिलाष बुद्धि सोडून माझी जिनगी माझे स्वाधीन कर यांत बरें आहे. नाहीं पेक्षां सरकारांत फिर्याद करणें मला भागच आहे हें ऐकून एसाजी रावानें आपले मनांत विचार केला कीं, हा जर बादशहाकडे फिर्याद गेला तर हल्ली न्यायाधीश बिरबल आहे तेव्हां हें कर्म त्यास व बादशहास कळलें तर मग आपलें गैरवर्तन आहे असें समजून ते कदाचित् आपल्यास न्यायाधिशीचें काम देण्यास अनुमान करतील तर आपला सर्वस्वी तोटा होणार आहे याची जिनगीतो आहे कितीशी फार झाली तर दहा हजारांची असेल न्यायाधिशीचें काम मिळालें तर एका महिन्यांत दहा हजार रुपये मिळवीन असा विचार करून विश्वासरावास म्हणाला मी तुझी परीक्षा पाहिली तुला जिनगी देत नाहीं म्हटलें तर तूं सरकारांत फिर्याद

करतोस की काय आणि सरकारांत गेलास तरी हो-
णार काय माझा लेख तुजपाशीं नाहीं व साक्षीदार ही
कोणी नाहीं बादशहा जिनगी मजकडून तुला कशी
देववील परंतु तसें कांहीं नाहीं आपली सर्व जिनगी
घेऊन जा आणि तुझे मनांत जो मज विषयीं विश्वा
स घातल्याचा विकल्प आला आहे तो सोडून देऊन
पूर्ववत ममता कायम कर हें ऐकून विश्वासरावा-
नें फार उत्तम आहे असें म्हणून आपली जिनगी-
सर्व त्याज पासून घेऊन घरीं निघोन गेला नंतर कि-
ती एक दिवस एसाजीराव बिरबलाचे बोलावण्या
ची वाट पहात होता परंतु बोलावणें आलेंच नाहीं.

## गोष्ट ५२वी.

## काजीचें कपट व रफूगाराचे कसब.

दिल्ली शहरामध्यें नूर बिबी नावाची एक पिं-
जारीण रहात असे तिचे मनांत यात्रे करितां म-
क्कूस जाण्याचें आलें तेव्हां तिणें आपले जवळची
जिनगी विकून रोकड रुपये केले आणि यात्रेचे ख-
र्चास जितके पाहिजे होते तितके बरोबर घेऊन बा-

की पांच हजार रुपये शिलक राहिले ते एका मजबू-
द पिशवींत घालून तिनें तोंड बंद केलें आणि वर आ
पली मोहोर बदोबस्ता करितां केली आणि ती पिश
वी यात्रेहून येई पर्यंत सांभाळण्या करितां त्याशह-
रचा जो काजी होता त्याजपाशीं दिली आणि सांगि
तलें कीं, जर करितां मी यात्रेस जात आहें तिकडे म-
रण पावल्यें तर या पिशवींत पांच हजार रुपये आहे
त हे तुह्मीं घेऊन त्याचा तुमचे इच्छेस येईल त्याप्र-
माणें दान धर्म करून टाकावा. जर करितां सुरक्षी-
त मी परत आल्यें तर मी आपली पिशवी मोहोर-
बंद परत घेईन असें तिनें बोलणें ऐकून काजी म्ह-
णाला फार बरें आहे तेव्हां ती पिशवी तिनें काजीचे
हवालीं करून आपण मक्केचे यात्रेस गेली. ती ति-
कडून दहा वर्षांनीं परत आली. आणि आपली थै-
ली काजी जवळ मागूं लागली ते समयीं काजीनें-
तिची थैली आणून तिचे स्वाधीन केली आणि आ-
पले खुणेची मोहोर वगैरे जशी होती तशी तपासू-
न घेण्या विषयीं सांगितलें तिणें ती आपली खूण

सकून वीतभर गादीचें कापड फाडून ठेविलें ही गोष्ट कोणास माहीत नसोन फक्त बादशहासच माहीत होती. दुसरे दिवशीं बिछाना झाडण्या करितां फरासानें गादीवरील चादर काढिली तों कोंपरा फाटलेला त्याचे दृष्टीस पडला तेव्हां अत्यंत घाबरला आणि दुसरे फरासास हांक मारून तें दाखविता झाला. आतां ही गोष्ट जर बादशहास कळली तर तो काय पारिपत्य करील कोण जाणे या चिंतेंत पडले तेसमयीं त्यांत वृद्ध फरास होता त्यानें सांगितलें तुम्ही स्वस्थ असा मी त्याचा बंदोबस्त करितों असें म्हणून त्या शहरांत रत्नाजी नावाचा शिंपी होता तो रफू करण्याचे कामांत फार कारागीर होता त्यास बोलावून आणून त्याजपासून गादीस रफू करवून घेतला तेव्हां ती गादी कोठें फाटली होती हें कोणाच्यानें ही सांगवलें नाहीं असें बेमालूम काम झालें सें पाहून सर्व फरास आनंद पावले. तंतर रात्रौ बादशहा निद्रा करावयास महालांत आला आणि गादीचे चारी कोंप-

रें तपासून पाहूं लागला. तों कोठें फाटलेली जागा दृष्टीस पडेना तेव्हां फरासास बोलावून आणून त्यास अभय दिलें आणि फाटलेली गादी धड कशी झाली म्हणोन विचारिलें तेव्हां फरासांनीं रफू करविल्याचा प्रकार बादशहास सांगितला. ते समयीं बादशहा म्हणाला त्या रफूगारास बोलावून आण तेव्हां फरास जाऊन रफूगारास बादशहाजवळ घेऊन आले तों येतांच बादशहा त्यास म्हणाला तुह्मीं पैशांची पिशवी फाटलेली कधीं रफू केलेली स्मरणांत आहे काय? रफूगार म्हणाला, दोन वर्षें झालीं एक थैली आंत कांहीं खुर्दा व कांहीं शिशाच्या चकत्या भरलेली आपले काजी साहेबांनीं मजपासून रफू करवून घेतली ती बेमालूम झालेली पाहून मेहेनती बद्दल मजला दोन मोहोरा दिल्या होत्या त्या शिवाय दुसरी पिशवी मी कोणाची कधीं रफू केल्याचें मला आठवत नाहीं हें ऐकून बादशहानें फरासास त्या वृद्ध नूरबिबी बाई कडे पाठवून तिचें जवळची थैली आणविली ती रफूगारासे पुढें ठेविली

ती पहातांच त्यानें ती ओळखून हीच पिशवी रफू केलेली आहे असें सांगून कोणते जागीं कितीला बीचा रफू केला आहे ती जागा दाखविली. तें कौतुक पाहून काजी विषयीं बादशहास अतीशय राग आला. तंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळ होतांच दरबार करून काजीस बोलावून आणविलें आणि थैलीं तील रुपयां विषयीं त्यास विचारिलें तेव्हां प्रथम तर त्यानें कानावर हातच ठेविले, नंतर बादशहानें त्या रत्नाजी शिंप्यास बोलावून काजीचे समक्ष ती थैली त्याच्या पुढें टाकिली आणि रफू केलेला काढून फाटकी जागा मोकळी करविली आणि पुनः काजीस विचारिलें तेव्हां काजी कबूल झाला आणि पांच हजार रुपये हजीर करतों असें बादशहा जवळ कबूल करून घरीं गेला आणि रुपये आणून हजीर केले ते रुपये बादशहानें नूरबिबी बाईस बोलावून तिचे स्वाधीन केले. व कोतवालास बोलावून हुकूम केला कीं. काजीचें घरदार लुटून सर्व सरकारांत आणावें आणि काजीस दहा वर्षे-

पर्यंत शंभर हात खोल बुरजांत बेडी घालून ठेवा- वें दररोज एकवेळ दहा तोळे अन्न व वीस तोळे पा- णी असें देत जावें त्याप्रमाणें सेवकांनीं काजीस ने- ऊन बुरुजांत ठेविलें.

## भाग ५वा समाप्त.

पुढील भागांत सुरस व चमत्कारिक गोष्टी आहेत.

---

| | |
|---|---|
| शृंगार मंजरी. | ६१२ |
| मुलांकरितां गमती चें पहिलें पुस्तक- (यांत उखाणे वश्लो- क वगैरे कोडीं उत्तरा सहित आहेत. | ६४ |
| हरिश्चंद्र सत्वदर्शन ना. | ६१२ |
| रावणवधनाटक. | ६८ |
| वत्सलाहरण ना. | ६७ |
| सुलोचना सती ना. | ६१२ |
| प्रिया ळ चांगुणा ना. | ६६ |
| विराटपर्व ना. | ६१३ |
| पार्थ प्रतिज्ञा ना. | ६१० |
| गोपीचंद नाटक. | १ |
| सहदेव भाडळी ज्यो तिष रत्न. | ६१० |
| रंभा शुक संवाद प्रा- कृत टीके सहित. | ६२ |

| | |
|---|---|
| गजेंद्र मोक्ष-श्लोक. | ६२ |
| नारायण रावाचे मृ- त्युचें नाटक. | १ |
| बकासूर नाटक. | ६६ |
| सीतास्वयंवरनाटक. | ६१० |
| **मोठीं पुस्तकें.** | |
| स्यमंतक मण्याची ब- खर. | ६१ |
| ययाती राजाची ब. | ६१ |
| कचोपाख्यान ब. | ६१ |
| दशरथ राजाची ब. | ६१६६ |
| मारुतीची बखर. | ६२ |
| जयद्रथ राजाची ब. | ६१ |
| पांडवांची बखर. | ६२ |
| नळराजाची बखर. | ६२ |
| द्रोणाचार्याची ब. | ६१६६ |

पुढें लिस्ट पहा.